येथपर्यंत आपण वैज्ञानिक विचारसरणीवरील काही अनिष्ट प्रभावांचा थोडक्यात विचार केला. यानंतर येणारी प्रत्यक्ष विज्ञानपद्धतीची चर्चा थोडी तांत्रिक होणे विषयदृष्टचा अपरिहार्य आहे असे येथे सुचवावेसे वाटते.

विज्ञानसंशोधनक्षेत्रात कार्य करणारे शास्त्रज्ञ अवलंबितात त्या पद्धती सामान्य जीवनातील पद्धतींचेच, विशेषत: शारीरिक श्रमउद्योगांतील पद्धतींचेच, उत्क्रांत स्वरुप आहे. समोर असलेल्या वस्तुमांडणीची प्रथम पाहणी करणे व नंतर विशिष्ट उद्देश सफल होतो किंवा नाही यासाठी कोणती तरी क्रिया करणे हे या पद्धतीचे दोन स्थूल भाग आहेत. शास्त्रीय परिभाषेत आपण यांना निरीक्षण व प्रयोग अशी नावे देतो. निरीक्षणात विशेष काय आहे, शास्त्रज्ञ असो अगर नसो, प्रत्येकजण निरीक्षण करीतच असतो असे प्रश्न येथे उद्भवतात. कोणत्या गोष्टींचे, घटनांचे निरीक्षण करावयाचे व कसे करावयाचे हे महत्वाचे आहे. याच बाबींवरून शास्त्रज्ञ व कलावंत यांच्यात फरक पडतो. प्रत्येक कलावंत, जे दिसते ते स्वत:ला येणाऱ्या अनुभवांवरून व संवेदनांवरून कसे कायाकल्पित करावयाचे या दृष्टीने निरीक्षण करतो. शास्त्रज्ञ मात्र, स्वत:च्या भावभावनांपासून शक्यतो मुक्त असलेले काही वस्तुनिष्ठ घटक व त्यामधील परस्परसंबंध हुडकून काढण्यासाठी निरीक्षण करतो. परंतु हे करताना शास्त्रज्ञासमोर कोणताच जाणीवपूर्ण हेतू किंवा उद्दिष्ट असण्याची गरज नसते असा मात्र याचा अर्थ नाही.

एखाद्या उद्दिष्टावाचून शास्त्रज्ञाचे निरीक्षण खऱ्या अर्थाने ‘निरीक्षण’ होऊच शकत नाही. नवीन शोध लावण्यासाठी कोणत्या तरी उद्दिष्टाची, बहुधा व्यावहारिक उद्दिष्टाची, प्रेरणा अत्यावश्यक असते हे आपणास विज्ञानाच्या इतिहासावरून सहज दिसून येईल. परंतु, निर्जीव सृष्टिविषयक सत्यस्वरूप जाणून घेण्यासाठी, सर्व भावनिक आवाहनांकडे दुर्लक्ष करून, वस्तुस्थिती व तिचे नियम यांच्यापुढे व्यक्तिगत इच्छा, आवडीनिवडी दुय्यम मानावयाच्या हा सर्व शास्त्रीय निरीक्षणाचा गाभा आहे.

प्राथमिक निरीक्षणातून यथावकाश दोन तंत्रांचा विकास झाला आहे: वर्गीकरण व मोजमाप. ही दोन्हीही तंत्रे प्रत्यक्ष विज्ञानाहून खूपच पुरातन आहेत. परंतु ती विज्ञानांत एका विशेष प्रकारे वापरतात. निसर्गातील परिणाम व घटना यांच्या नवनवीन गटांच्या आकलनासाठी ‘वर्गीकरण’ हा एक महत्त्याचा मार्ग ठरला आहे. या गटांसंबंधी काहीही सांगण्याआधी प्रथम त्यांची व्यवस्था लावून घ्यावी लागते. ही व्यवस्था लावण्याचा पुढील टप्पा म्हणजे

मोजमाप. एका संग्रहातील किंवा संचातील घटकांची दुसऱ्या संचातील घटकांशी संगतता स्थापन करण्यासाठी आपण अंकमोजणी करतो. ही मोजणी करताना हाताची बोटे वापरणे म्हणजे वस्तूंचा संच व बोटांचा संच यांची संगतता स्थापन करणे होय. तसेच, ज्या भौतिक राशीचे मापन करावयाचे त्या राशी-बरोबर प्रमाणभूत संचांतील घटकांची तुलना करणे म्हणजे मोजमाप होय. मोजमापाच्या महत्वपूर्ण कल्पनेमुळे विज्ञान एका बाजूला गणिताशी संलग्न झाले तर दुसऱ्या बाजूला व्यापारी व यांत्रिक व्यवहारांशी जोडले गेले. मोजमापा-मुळेच विज्ञानात अंकाचे प्रस्थ वाढले आणि अपेक्षित परिणाम पाहण्यासाठी कोणती विशिष्ट परिस्थिती पुनरुत्पन्न करावी याचे अचूक दिग्दर्शन करता येणे शक्य झाले.

विज्ञानपद्धतीच्या रूपरेषेत विज्ञानाची क्रियात्मक बाजू या ठिकाणी पहिल्या प्रथम आपणास दिसते. ही बाजू म्हणजे विज्ञानांतील 'प्रयोग' होय. प्रयोग म्हणजे चांचणी हे त्या शब्दावरूनच आपल्याला समजते. सुरुवातीच्या काळांत झालेले प्रयोग खरे म्हणजे पूर्णप्रमाणावरील (full-scale) चांच-ण्याच होत्या. परंतु मोजमापाची कल्पना एकदा 'प्रयोगा' त प्रविष्ट झाल्यावर दोन फायदे झाले. एक म्हणजे, या चांचण्या अचूकपणे व काटेकोरपणे पुन्हा पुन्हा घेणे शक्य झाले. त्याचप्रमाणे प्रत्येक चांचणी पूर्णप्रमाणावर (यथातथ्य प्रमाणावर) न करता फक्त लघुप्रमाणावरच (small-scale) करण्याचे धाडसी पाऊल टाकता आले. छोटया प्रमाणावरील नमुनेदार प्रयोग ही आधु-निक विज्ञानाची एक प्राणकल्पना आहे. लहान प्रमाणावर प्रयोगरचना केल्या-मुळे अशा चाचण्यांचा खर्च कमी येतो व त्यामुळे एकाचवेळी (तुलनात्मक उद्दिष्टांसाठी) अनेक चाचण्या घेणेही शक्य होते. तसेच, खर्चिक ठरणाऱ्या एक दोनच यथातथ्य प्रमाणावर सांगोपांग चांचण्या घेण्यापेक्षा छोटया प्रमाणावरील अनेक प्रयोग केल्यामुळे, गणिताचा उपयोग करून किती तरी अधिक महत्त्वाचे निष्कर्ष काढता येतात. अखेरीस सर्व प्रयोगांत फक्त दोनच प्राथमिक मूलभूत क्रियांचा समावेश असतो : सुटे करणे व पुन्हा एकत्र जुळवणी करणे. शास्त्रीय परिभाषेत याला विश्लेषण व संश्लेषण अशी नावे आहेत. एखादी घटना किंवा प्रक्रिया, तिच्या घटकांमध्ये सुटी केल्याशिवाय त्याबद्दल, ती समग्रतेने पाहण्यापलीकडे, काहीच करता येत नाही. त्याचप्रमाणे, हे घटक योग्य प्रकारे एकत्र जुळवून मूळ घटना सर्वांगाने साकार केल्याशिवाय, तिच्या विश्लेषणांत एखादी स्वतःच्या पदरची व्यक्तिनिष्ठ कल्पना घुसडली होती, किंवा काही अपरिहार्य असलेले अर्थपूर्ण घटक वगळले होते हेही समजू शकत नाही.

वैज्ञानिक प्रयोगाला आवश्यक असलेल्या क्रिया करण्यासाठी शास्त्रज्ञांनी अनेक शतकांच्या परिश्रमांतून पार्थिव साधनांचा संपूर्ण संच सिद्ध केला आहे. याला विज्ञानाचा 'उपकरणसंच' असे म्हणतात. खरे म्हणजे, उपकरणसंचाच्या कल्पनेत गूढ असे काहीच नाही. नेहमीच्या व्यवहारातील साधनेच विशेष उद्देशांकरितां, थोडे फार बदल करून वापरली की विज्ञानाचा उपकरणसंच तयार होतो. प्रयोगशाळेतील चिनीमातीची मूस म्हणजे एक प्रकारचे भांडेच आहे, आणि लहान वजने उचलावयाचा चिमटा म्हणजे व्यवहारातील चिमट्याचीच एक लहान प्रतिकृति आहे. याउलट बऱ्याच वेळा वैज्ञानिकांची उपकरणे दैनंदिन जीवनांत उपयुक्त साधनांच्या स्वरूपांत पुन्हा परत येतात. उदाहरणार्थ, आज अनेक ठिकाणी दिसणारा दूरदर्शनसंच, अगदी अलिकडील काळापर्यन्त, इलेक्ट्रॉनचे वस्तुमान मोजण्यासाठी बनविलेली प्रयोगशाळेतील केवळ एक ऋण–किरण नलिका (Cathode–ray tube) होती. वैज्ञानिक उपकरणांमुळे दोन प्रधान उद्देश साध्य होतात. एक म्हणजे, सभोवतालच्या जगाचा आपणास येणारा ऐंद्रिय अनुभव जास्त अचूक करण्यासाठी वैज्ञानिक साधने म्हणून ती उपयोगी पडतात, उदा., टेलिस्कोप किंवा मायक्रोफोन. दुसरे म्हणजे, काही क्रिया घडविण्यासाठीही आपण या उपकरणांचा उपयोग करू शकतो. उदा., निरनिराळ्या वस्तूंची कौशल्यपूर्ण हालचाल करण्यासाठी किंवा त्यांच्यावर नियंत्रित पद्धतीने काही प्रक्रिया करण्यासाठी आपण मायक्रोमॅनिप्युलेटर किंवा इन्क्युबेटर ( उबवण यंत्र ) इत्यादि वापरतो.

प्रयोगांच्या निष्कर्षावरून, किंवा खरे म्हणजे प्रयोगात अंतर्भूत असलेली निरीक्षणे व क्रिया यांच्या मिश्रणातून सबंध वैज्ञानिक ज्ञानकोशाचा उद्‌भव झाला आहे. परंतु, या निष्कर्षांची केवळ जंत्री असे मात्र या ज्ञानकोशाचे स्वरूप नाही. तसे जर असते तर जेथून त्याची सुरुवात झाली त्या निसर्गाच्या आकलनाइतकेच सर्व विज्ञान अवजड व दुर्गम झाले असते. हे निष्कर्ष उपयुक्त होण्यासाठी, आणि काही वेळा केवळ प्राप्त होण्यासाठीही, ते जणू काही एकत्र बांधावे लागतात, त्यांचे संच करून त्यांच्यामधील संबंध प्रस्थापित करावे लागतात. हे सहसंबंध समजल्याशिवाय सर्व विज्ञान फोल ठरते. निष्कर्षसंचातील सहसंबंध सिद्ध करणे हे विज्ञानातील तर्कशास्त्राचे प्रयोजन आणि उत्तरदायित्व आहे. विज्ञानातील युक्तिवाद, गणितशास्त्रीय चिन्हे व सूत्रे, तसेच अगदी सुरुवातीच्या अवस्थात होणारा केवळ पारिभाषिक संज्ञांचा उपयोग या सर्वांतून वैज्ञानिक नियम, तत्त्वे, गृहीतकृत्ये, सिद्धांत व उपपत्ती यांचा बऱ्याच अंशी सुसंगत असा भव्य प्रासाद तयार होत असतो, सलगपणे नितनिर्मित होत असतो. आणि एवढे

झाले म्हणजे संपले असेही होत नाही. याच ठिकाणी विज्ञानाचा पुनरपि प्रारंभ होत असतो. कारण याच सिद्धांतांतून आणि उपपत्तींतून तंत्रविज्ञानाचा विकास होतो व अनेक नवीन प्रकारची व्यावहारिक उपयोजने सिद्ध होतात. ही उपयोजित संशोधनफलिते व्यवहारात उपयोगी ठरली, किंवा बहुतेक वेळा अयशस्वी ठरली, तरी त्यांचे विज्ञानविकासाला नवीन निरीक्षणे, नवीन प्रयोग व नवीन उपपत्तींची प्रेरणा या स्वरूपात अंशदान होते. प्रयोग, अर्थ-उकल आणि उपयोजन या विज्ञानाच्या सर्व बाजू एकाच वेळी प्रगत होत असतात, आणि एकमेकास पूरक होत, विज्ञानाचा प्रभावी, चैतन्यपूर्ण, सामाजिक ज्ञानकोश सिद्ध करीत असतात.

निरीक्षण, प्रयोग व तर्कसंगत अर्थाविष्कार या प्रक्रियेतून विज्ञानाची परिभाषा किंवा खरे तर अनेक परिभाषा विकसित झाल्या आहेत. विज्ञानाची प्रगति होताना उपकरणांप्रमाणे या भाषाही विज्ञानाचे एक अविभाज्य अंग होऊन बसल्या आहेत. वैज्ञानिक उपकरणांप्रमाणेच, या भाषा मूलतः अपरिचित अशा स्वरूपाच्या नसून व्यावहारिक भाषारिवाजातूनच त्या निर्माण झाल्या आहेत, व बऱ्याच वेळा त्या पुन्हा उगमाच्या पातळीवर परत आल्या आहेत. उदा.,– 'सायकल' हा इंग्रजी शब्द चक्र, चाक या अर्थाचा ! परंतु, अनेक शतके तो 'पुन्हा पुन्हा घडणाऱ्या घटनां'च्या संदर्भात 'आवर्तन' या अर्थी रूढ झाला होता. अखेरीस तो 'बायसिकल' (दुचाकी) या व्यवहारातील इंग्रजी शब्दांत पुन्हा प्रविष्ट झाला. निरनिराळ्या शब्दांच्या व्यावहारिक अर्थांशी गल्लत होऊ नये म्हणून ग्रीस आणि रोम येथील विस्मृत भाषेतील अनेक रूढ व सर्वसामान्य शब्दांचा इंग्रजी परिभाषेसाठी सर्रास उपयोग केला गेला. वैज्ञानिक परिभाषा हाताशी नसल्यामुळे ग्रीक शास्त्रज्ञांची फारच अडचण होत असे. व्यवहारातील शब्द वापरूनच वैज्ञानिक आशय व्यक्त करावा लागत असल्यामुळे शब्दांची वर्णनात्मक लांबण लावणे त्यांना क्रमप्राप्त होई. विज्ञानाची परिभाषा निर्माण झाल्यामुळे वैज्ञानिकांना एकमेकांशी निःसंदिग्धपणे व संक्षिप्तपणे चर्चा करणे सुकर झाले. परंतु या प्रथेचा एक तोटा मात्र झाला. एकापाठोपाठ एक तंत्रजड परिभाषांची निर्मिती व वाढ झाल्यामुळे सामान्य माणूस व विज्ञान यामधील दरी दिवसेंदिवस रुंदावत गेली. काही वेळा तर हा प्रकार बुद्धिपुरस्सर केला गेला. वास्तविक असा परकेपणा निर्माण करण्याची काहीच आवश्यकता नाही. वैज्ञानिक परिभाषा अत्यंत उपयुक्त असल्यामुळे ती विसरली जावी असे कुणीच म्हणणार नाही. परंतु, वैज्ञानिक सुखसाधनांप्रमाणे वैज्ञानिक कल्पनाही जेव्हा दैनंदिन जीवनाची पूर्णपरिचित

उपांगे होतील, वैज्ञानिक आशय जेव्हा जनमानसात मिसळून जाईल तेव्हाच एकलेपणाच्या मनोऱ्यात कोंडून राहिलेली ही परिभाषा सर्वसामान्यांच्या बोली भाषेशी एकरूप होऊ शकेल, व हे घडण्याची अनेक कारणास्तव फार जरुरी आहे.

विज्ञानविकासाला कारणीभूत होणाऱ्या कार्यचातुरीपुरतेच ( tactics ) आतापर्यंत विज्ञानपद्धतीचे विवेचन झाले आहे. निरनिराळे वैज्ञानिक प्रश्न सोडविण्याची एक पद्धति, आणि प्राप्त झालेली उत्तरे समाधानकारक असतील याबद्दल, पूर्ण जरी नाही तरी, बराचसा बुद्धिजन्य विश्वास हे या कार्यचातुरीचे प्रधान लक्षण आहे. परंतु आजपर्यंतच्या दीर्घ कालखंडावर पसरलेल्या वैज्ञानिक प्रगतीचे व यशस्वितेचे रहस्य समजावयास विज्ञानपद्धतीचा केवळ तांत्रिक भाग पुरा होत नाही. या पद्धतीचे समग्र ग्रहण होण्यासाठी विज्ञानाच्या मूलभूत भूमिकेची मीमांसा करणे अपरिहार्य ठरते. विज्ञानपद्धतीच्या या उपांगाला आपण विज्ञानाची उद्देशनीति (strategy) असे संबोधणार आहोत. आता एक गोष्ट मात्र खरी आहे की, प्रगति करण्यासाठी विज्ञानाला कोणत्या तरी उद्देशनीतीचा जाणीवपूर्वक अवलंब करावा लागतोच असे नाही. किंबहुना सुरुवातीच्या काळात तरी, काही विशिष्ट, दीर्घ पल्ल्याचे उद्देश समोर ठेवून नंतर विज्ञानाने त्या दिशेने वाटचाल केली असे मुळीच दिसत नाही. तरीसुद्धा, विज्ञानविकासाचा आजपर्यंतचा मार्ग पूर्णपणे आकृतिबंधहीन, स्वैर, किंवा यादृच्छिक आहे अशी मात्र बिलकूल परिस्थिती नाही. विज्ञानाची उद्देशनीति बहुतेक सर्व काली जरी जाणीवशून्य असली तरी काही वेळा ती जाणीवपूर्णही होती. कसेही असले तरी विज्ञानाच्या प्रदीर्घ वाटचालीच्या सर्वच कालखंडात कोणती तरी उद्देशनीति प्रवर्तित होत असली पाहिजे असे समजणे स्वाभाविकच ठरेल.

या नीतीचे स्वरूप कोणते असा प्रश्न येथे उत्पन्न होतो. वैज्ञानिक शोध लावण्यासाठी जे डावपेच लढवावे लागतात त्यांची एक अत्यावश्यक बाजू अशी आहे की, ज्या समस्या सोडवायच्या आहेत त्यांचा एक विशिष्ट क्रम निश्चित करावा लागतो. सर्वसाधारण रूढ समज असा आहे की, वैज्ञानिक समस्या उपस्थित करण्यापेक्षा त्यांचे निराकरण करणे जास्त अवघड असते. परंतु नवीन विज्ञाननिर्मितीच्या आघाडीवर मात्र यापेक्षा उलट परिस्थिती असते. एखादी समस्या सर्वांगानी व यथार्थतेने प्रज्ञाकोशात प्रत्ययीभूत होणे, हे तिची उकल करण्यापेक्षा किती तरी अधिक कठीण असते. समस्येच्या प्रत्ययासाठी श्रेष्ठ

प्रतीच्या कल्पनाशक्तीची जरूरी असते, तर समस्येचे निराकरण हस्तगत करण्यासाठी केवळ कल्पकता पुरेशी होते. (वैज्ञानिक प्रश्न सोडविणे एक सहज सोपी गोष्ट आहे असे येथे सुचवायचे नसून वरील विधाने केवळ तुलनात्मक विचारांच्या संदर्भात केली आहेत ). प्रा. डी. डी. कोसांबी यांनी 'निकडीचा किंवा गरजेचा अनुभवसिद्ध बोध' (Cognition of necessity) अशी जी विज्ञानाची व्याख्या केली आहे तिचा तथ्यांश हाच आहे. मुख्यत्वेकरून, साक्षात आर्थिक गरजेपोटी जे प्रश्न निर्माण झाले त्यांची उत्तरे शोधताना, व त्याखालोखाल आधीच हस्तगत झालेल्या संशोधनात अनुस्यूत असलेल्या संकल्पनांतून उद्भवणाऱ्या प्रश्नांचा निर्वाह करताना विज्ञानाचा सर्वसाधारण विकास झाला ही खरी वस्तुस्थिती आहे. कोणत्याही काळी विज्ञानापुढे आव्हानात्मक स्वरुपाचे काही प्रश्न बहुधा उभे असतातच. उदाहरणार्थ, डेल्फी नावाच्या ठिकाणी पूर्वी देवतांना बळी देण्यासाठी घन आकाराची जी वेदी होती तिचे आकारमान दुप्पट करण्याचा प्रश्न जेव्हा उत्पन्न झाला तेव्हा त्यातूनच अंकांचे घनमूळ काढण्याचा प्रश्न निर्माण झाला. तसेच, पृथ्वीवरील निरनिराळ्या ठिकाणांचे रेखांश शोधण्याच्या प्रश्नातून न्यूटनचे नियम प्राप्त झाले. एकोणिसाव्या शतकात फ्रान्समध्ये, रेशमाचा धागा देणाऱ्या किड्यांवर रोग पडून रेशीम–व्यवसायाचे नुकसान होऊ लागल्यामुळे, 'सूक्ष्म जंतूंमुळे रोग उद्भवतात' ही उपपत्ति शोधून काढण्यास पाश्चरला मदत झाली, हे उदाहरण तर सर्वश्रुतच आहे. परंतु अशा तऱ्हेच्या प्रकर्षाने जाणवणाऱ्या अभिजात प्रश्नांची संख्या केव्हाही मर्यादित असण्याचा संभव असतो हे विज्ञानाच्या प्रगतीच्या दृष्टीने एक प्रकारे अवरोधकारकच म्हटले पाहिजे. अशा प्रकारचे प्रश्न सोडवून त्यांची उत्तरे जास्तीत जास्त स्पष्ट व सांगोपांग करण्यासाठी वैज्ञानिकांच्या अनेक पिढ्या खर्ची पडल्या आहेत.

याच प्रवृत्तीमुळे विज्ञानेतिहासात प्रदीर्घ कालपर्यंत काही मर्यादित सीमा-रेषांच्या अरुंद पट्टीत विज्ञानाचा संचार होत राहिला, असे आपणास दिसते. परंतु, मानवी जीवनातील नवीन समस्यांच्या शोधासाठी ज्यावेळी विज्ञान अशा प्रकारचे बंध तोडून स्वतंत्र होते त्याचवेळी त्याला नवीन कार्यक्षेत्रे गवसतात आणि त्याच्या विकासाला जोरदार चालना मिळते. आजपर्यंत होऊन गेलेल्या न्यूटन, डार्विन, फॅरॅडे यासारख्या महान शास्त्रज्ञांनी नवीन समस्या शोधून त्यांचे निराकरण करण्याचा नियोजन–आराखडा स्वतःपुढे ठेवला होता. फॅरॅडेने त्याच्या वैज्ञानिक कारकीर्दीच्या सुरुवातीच्या काळातच, निसर्गात आढळणाऱ्या

अनुक्रमणिका

निरनिराळ्या प्रकारच्या बलांमधले– उदा. प्रकाश, उष्णता, विद्युत, चुंब-कत्व– परस्परसंबंध प्रस्थापित करून विशद करण्याचा मूलभूत प्रश्न सोडवावा असे ठरविले होते. आणि यातील प्रत्येक जोडी घेऊन, हा प्रश्न सोडविण्यात तो जवळजवळ यशस्वीही झाला. विज्ञानकक्षा रुंदावण्याचे असे बरेच प्रयत्न आपणास विज्ञानेतिहासात दिसून येतात.

या महान व्यक्तींनी, लहान प्रमाणावर का होईना, जे जाणीवपूर्वक व निष्ठेने केले तोच विज्ञानाच्या विकासाचा अत्यावश्यक भाग आहे हे आता आपल्या लक्षात येऊ लागले आहे. याच्या पुढचे पाऊल म्हणजे, विज्ञानाचे नियोजन केवळ व्यक्तिपुरते मर्यादित न ठेवता हेतुपुरस्सर व संघटितपणे सामुहिक पायावर करणे शक्य आहे याची जाणीव सर्वांना होऊ लागली आहे. मात्र हे करताना, आजपर्यंत कधी उपस्थित झाली नाही अशी एक नवीन विस्तृत समस्या उभी राहते. एका बाजूला सामाजिक व आर्थिक गरजा आणि दुसऱ्या बाजूला विज्ञानाच्या अंगभूत विकासाच्या प्रेरणा यांचा समन्वय साधण्याची निकड येथे उत्पन्न होते व यातून अनेक प्रश्नमालिकांचा जन्म होतो. या प्रश्नांच्या निराकरणासाठी व त्याचे संपूर्ण फायदे शोधून त्यांचा उपयोग करण्यासाठी राष्ट्रजीवनाचे पर्याप्त प्रमाणावर आर्थिक नियंत्रण करणे आवश्यक ठरते; समाजवादी राष्ट्रांबाहेरील जगतात आढळून येणाऱ्या या प्रकारच्या नियंत्रणापेक्षा अधिक प्रमाणात ते क्रमप्राप्त ठरते. परंतु दीर्घपल्ल्याचा विचार केला तर हे फायदे एवढे अमाप आहेत की, कोणतेही राष्ट्र–मग ते भांडवलवादी असो अगर समाजवादी असो–विज्ञानाच्या अशा विधायक व नियोजित उपयोजनाशिवाय जगू शकणार नाही हे आता अधिकाधिक स्पष्ट होत आहे. परिणामतः, विज्ञानाचा विकास व सामाजिक जीवनातील त्याचे वाढते उपयोजन पूर्वीप्रमाणे यदृच्छेने न होता भविष्यकाळी ते अधिक समंजसतेने व सुजाणतेने होईल असा विश्वास वाटतो.

सतत उत्क्रांत होणाऱ्या इतिहासाच्या सम्यक् चौकटीत जर विज्ञानाचा विचार केला तर, विज्ञान म्हणजे आपल्या शरीरातील ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये यांच्यामुळे येणाऱ्या अनुभवांचे जाणीवपूर्वक केलेले सांगोपांगीकरण होय असे दिसून येईल. सर्व उच्चश्रेणीय प्राण्यांमध्ये वसत असलेली विद्याग्रहणाची अबोध प्रक्रिया मनुष्यात तर प्रकर्षानेच आहे. विज्ञान या अबोध प्रक्रियेचे हेतुपुरस्सर व समाजलक्ष्यी विस्तृतीकरण करते. मानवेतर प्राणी अनुभवाने शिकू शकतो. परंतु, विज्ञानाची कास धरून मनुष्य यापेक्षाही पलीकडे जाऊ शकतो–शिकता यावे म्हणून अनुभव घेण्याची कला तो प्राप्त करून घेतो. तुलना, वर्गीकरण,

सामान्यीकरण (कक्षाविस्तार), गृहीतकृत्ये आणि शास्त्रीय उपपत्ती या सर्वांनी सिद्ध झालेली खुद्द विज्ञानपद्धतीही याच अर्थाने मानवी मेंदूतील यंत्रणेचे – ज्या यंत्रणेमुळे पुरातन कालीही उच्च श्रेणीय सस्तन प्राण्यांमध्ये विकट व अतिशय गुंतागुंतीच्या प्रसंगांना (उदा. भक्ष्याची शिकार करताना निर्माण होणारे प्रसंग) तोंड देण्याचे सामर्थ्य उत्पन्न झाले– एका प्रकारे विस्तृतीकरणच आहे. परंतु पशू-प्राण्यांच्या अशा प्रकारच्या संपादणुकीत व मानवनिर्मित वैज्ञानिक सिद्धींमध्ये एक महत्वाचा फरक आहे. प्राण्यांचे कर्तृत्व एकेकटयाचे असते, तर विज्ञान मात्र मूलभूतपणे एक सामाजिक साधित आहे. अनेकांच्या सहयोगात्मक 'कार्या'तून विज्ञानाचा उद्भव झाला आहे, आणि विशेष 'परिभाषे'ने ते समन्वित केले आहे.

मानवाच्या शारीरिक सामर्थ्याचे विज्ञानामुळे होणारे विस्तृतीकरण व वृद्धिकरण ही प्रक्रिया आता, इतर प्राण्यांप्रमाणे, एक सलग, जवळजवळ आपोआप होणारी उत्क्रांतिविकासी प्रक्रिया राहिलेली नाही. सामाजिक स्थित्यंतरांशी असलेल्या अटळ सहसंबंधाच्या स्वरूपात या प्रक्रियेचा उद्भव होतो. एकानंतर एक उदयाला येणाऱ्या नवनवीन सामाजिक वर्गांच्या अंतर्गत कलहक्लेशांनी आणि संघर्षांनी या प्रक्रियेचे रंगरूप ठरत असते. विज्ञान व समाज यामधील अविभाज्यता सतत ध्यानात ठेवल्यानंतर विज्ञान ज्या अंग-वैशिष्टयामुळे मनुष्याच्या इतर सामाजिक कार्यक्षेत्रांहून, उदा. कलाक्षेत्र, धर्म इ., व्यवच्छेदकपणे वेगळे ठरते त्या वैशिष्टयांचा विचार करता येतो. यांतील प्रमुख वैशिष्टये म्हणजे, विज्ञान मूलतः निरनिराळी कार्ये 'कशी' संपादन करावी याची चिंता करते; अनेक घटना व क्रिया यासंबंधीच्या, शेकडो वर्षे संचित झालेल्या संकलित ज्ञानसंग्रहावर त्याची उभारणी झालेली असते; व मानवाच्या भौतिक गरजा भागविण्यासाठी आवश्यक तंत्रकौशल्यांचे व उत्पादन साधनांचे आकलन करून घेणे, त्यांचे नियंत्रण करणे व त्यांत योग्य ते सुधार घडविणे ही त्याची आद्य व सर्वाधिक प्रयोजने असतात.

वरील तिन्ही लक्षणांपैकी पहिल्या लक्षणाचे वर्णन असे करता येईल की, विज्ञान प्रणाली ( Scientific mode ) निर्देशक आहे. म्हणजे, लोकांना जे करावयाची इच्छा आहे ते कोणत्या तंत्राने साध्य करावे याचे फक्त ती निर्देशन करते. एक गोष्ट करण्याऐवजी दुसरी कोणती तरी करण्याची इच्छा समाजाला व्हावी असा कोणताच प्रयत्न खुद्द विज्ञानप्रणाली करीत नाही. ही सूचना देण्याचे काम दुसऱ्या एका प्रणालीचे म्हणजे कलाप्रणालीचे ( artistic

अनुक्रमणिका

mode ) आहे. ही प्रणालीही विज्ञानाइतकीच समाजनिबद्ध असून, समाजामध्ये एका विशिष्ट कार्यासाठी प्रथम इच्छा व नंतर ईर्षा उत्पन्न करण्याचे महत्त्वाचे कर्तव्य या प्रणालीचे असते. यापैकी कोणतीही एक प्रणाली दुसरीवाचून पूर्णत्व पावू शकत नाही. किंबहुना विज्ञान व कला या दोन्हीही क्षेत्रात या दोन्ही प्रणाली नेहमी एकत्र असलेल्या आढळतात. परंतु, विज्ञान व कला या क्षेत्रांची प्रत्येक व्यक्तीला जाणवणारी अर्थपूर्णता या दोन प्रणालींमध्येच संपूर्णपणे भरून राहिली आहे असे मात्र नाही. या प्रणालींपलीकडेही, सर्व प्रकारच्या मानवी कामगिरींमध्ये एक आगळीच कृतार्थता समानत्वाने वसत असते. शब्द, ध्वनि व रंग यांच्या नाविन्यपूर्ण संयोगबंधांच्या चिंतनातून किंवा त्यांच्या नवनिर्मितीतून किंवा निसर्गात मुळातच आढळणाऱ्या संयोगांच्या संशोधनातून ही कृतार्थता, हा प्रसाद स्वाभाविकपणे निर्माण होत असतो. सुरुवातीला जरी हा आनंद व्यक्तिगत असला तरी त्या व्यक्तिपुरतीच सीमित असलेली ती केवळ एक खाजगी भावना असते अशांतला मात्र मुळीच भाग नाही. विज्ञानाची प्रेरणा ज्याप्रमाणे सामाजिक स्वरूपाची असते त्याचप्रमाणे चिंतनक्रिया हीसुद्धा अंतिमतः सामाजिक स्वरूपाचीच असते. या कारणानेच हा आनंद समाजामध्ये संक्रमित करण्याची कोणत्याही वैज्ञानिकाची अगर कलावंताची तीव्र इच्छा असते.*

---

* या ठिकाणी विवेचनात, विज्ञानप्रणाली ( scientific mode ) व कलाप्रणाली ( artistic mode ) असे दोन तांत्रिक शब्द आले आहेत. या शब्दांचा आशय अचूकपणे समजून घेणे आवश्यक आहे. प्रा. हाल्डेन यांनी सुचविलेली विचारसरणी व पशुपक्ष्यांच्या आपापसातील संदेशवहनाबाबतचे प्रायोगिक संशोधन जर ग्राह्य धरले तर या दोन प्रणालींमधील फरक अतिप्राचीन काळीही अस्तित्वात होता असे दिसते. यातील कलाप्रणाली तर अत्यंत पुरातन, आदिम, पृथ्वीवर मनुष्यप्राण्याचा अवतार होण्याआधीपासून व जवळजवळ समाज किंवा कळपकल्पना प्रादुर्भूत होण्याआधीपासून दिसून येते. पक्ष्यांची भाषा एक प्रकारे गूढ, व क्रियेसाठी उद्युक्त करणारी असते. पक्षी अशा प्रकारे स्वतःच्या अंतर्यामीची भावनिक स्थिती किंवा क्रियापूर्वीची सिद्धता निर्देशित करीत असतात. या प्रतिक्रिया जरी सभोवतालच्या जगातील काही घटनांनी घडवून आणल्या असल्या तरी त्या घटनांचे कोणतेच वर्णन त्या प्रतिक्रियांत अनुस्यूत असत नाही. प्रा. हाल्डेन यांच्या मते, ‘ वर्णना ’चा वैज्ञानिक घटक, क्रियाप्रवण करणाऱ्या आवाहनावर अध्यारोपित करणे हे मानवी भाषेचे वैशिष्ट्यपूर्ण लक्षण आहे. मानवी भाषेत विज्ञानप्रणाली व कलाप्रणाली या दोन्हीही

प्रत्येक वैज्ञानिक संशोधनकार्य जसे स्वतः उद्देशपूर्ण असते तसेच ते नवीन उद्देशांना जन्म देणारेही असते. परंतु तो उद्देश म्हणजे संशोधनकार्याची वैज्ञानिक बाजू असते असे मात्र नव्हे. तसेच, विज्ञान-उपपत्तीत किंवा प्रायोगिक यशस्वितेत जाणवणारे सौंदर्य व आनंद यांचाही त्या उद्देशाशी काहीच संबंध नसतो. विशुद्ध वैज्ञानिक दृष्टया पाहिले तर ते कार्य म्हणजे एक कृतिपाठ असतो. काही विशिष्ट 'गोष्टी' जर साध्य करावयाच्या असतील तर त्या कशा कराव्या हे त्या संशोधनावरून आपणास समजते. याउलट प्रत्येक कलाकृति केवळ आनंददायी व भावना हेलावणारी या स्वरूपातच असते असे मानणेही योग्य होणार नाही. या कलाकृतींमध्ये सभोवतालच्या वस्तुस्थितीचे अमोल माहितीज्ञान अंतर्भूत असते. तसेच, साक्षात भौतिक व सामाजिक वस्तुस्थितीच्या चौकटीत मनुष्याने कसे जगावे याचेही परिपाठ या कलाकृतींतून, विशेषतः त्या जेव्हा एखाद्या कादंबरीप्रमाणे सामाजिक प्रश्नांचा परामर्श घेतात तेव्हा आपणास प्राप्त होऊ शकतात.

विज्ञानाची ही अमूर्त वैशिष्टये मांडताना नेहमी एक धोका उत्पन्न होण्याचा संभव असतो. विज्ञानाचे अमूर्त स्वरूप हेच आदर्श स्वरूप असून विज्ञानाचे सामाजिक उत्तरदायित्व, उपयुक्तता इत्यादि आगंतुक बाजू जर काढून टाकल्या तर विज्ञानाला हेच आदर्श, विशुद्ध स्वरूप प्राप्त होईल आणि तसेच खरोखरी असावयास हवे अशी समजूत होण्यात हा धोका अभिप्रेत आहे. वास्तविक, 'केवळ सत्याच्या प्रतिष्ठेसाठी सत्याचा शोध घेणे हेच विज्ञानाचे प्रयोजन आहे' हे एका विशिष्ट सामाजिक दृष्टीचे दर्शन घडविणारे जाणीवपूर्ण विधान आहे. या दृष्टिकोनामुळे वेळोवेळी विज्ञान विकासाला खीळ घातली आहे; आणि उद्‌बोधन विरोधकांच्या व प्रतिगाम्यांच्या हाती विज्ञान सोपविण्यास मदत झाली आहे. विज्ञानाचे व्यावहारिक कृतिपाठ जर अनुसरले तरच विज्ञानाला पूर्णत्व

---

एकमेकांच्या छटांत नकळत मिसळून गेलेल्या असतात. उदा., 'चला, मासे पकडायला जाऊ या' हे वाक्य कलाप्रणालीसूचक आहे. परंतु त्यानंतर येणारे, 'गेल्या वर्षी या तळ्यात मासे होते' हे वाक्य 'निर्देशन' करणाऱ्या विज्ञान-प्रणालीचे आहे. अर्थात, हा सर्व ऊहापोह फक्त सर्वसाधारण स्वरूपाचा आहे. विज्ञानाप्रमाणेच कलेची व्याख्या करण्यातही विशेष अर्थ किंवा स्वारस्य नाही. दोन्हीही क्षेत्रांचा इतिहास स्वायत्त रीत्या, स्वतंत्रपणे घडलेल्या उत्क्रांतीचा इतिहास आहे. मानवनिर्मित कादंबरीसाहित्य एखाद्या रानटी विधीच्या वेळी होणाऱ्या नृत्यापेक्षा वैज्ञानिक प्रबंधाला निकटचे आहे.

येते ही गोष्ट सदैव ध्यानात बाळगली पाहिजे. विज्ञान ही केवळ शुद्ध चिंतनाची किंवा विचारमंथनाची बाब नव्हे. वैज्ञानिक विचार सातत्याने व्यवहारात उतरविला जातो आणि व्यवहाराने तो सतत चैतन्यशाली बनत असतो. म्हणूनच तंत्रविचारापासून वेगळे काढून विज्ञानाचा विचार करता येत नाही. विज्ञानाच्या इतिहासावरून असे वारंवार दिसून येईल की, व्यवहारातील प्रथा आणि सराव यामधून विज्ञानाला नवीन कक्षा प्राप्त झाल्या, तर विज्ञान क्षेत्रातील अभिवृद्धीमुळे व्यवहाराची नवीन दालने उघडली गेली. आजचे अभियांत्रिकी व्यवसाय बऱ्याच प्रमाणात विज्ञानविकासाचे प्रत्यक्ष फल आहे. निरनिराळ्या अभियंत्यांची केवळ व्यावसायिक पदे जरी पाहिली तरी ही गोष्ट सहज समजते. विद्युत-अभियंता, रासायनिक-अभियंता, रेडिओ-अभियंता, इत्यादींवरून, या सर्व शाखा सुरुवातीस विज्ञानाच्या शाखा होत्या व त्यानंतर व्यवसायशाखा झाल्या हे उघड आहे.

परंतु, निरनिराळ्या क्षेत्रांतील अभियंते जरी वैज्ञानिकांतूनच निर्माण झाले असले, आणि व्यावसायिक दृष्ट्या ते सातत्याने आणि घनिष्ठपणे जरी वैज्ञानिकांशी संबंधित असले तरी विज्ञान व अभियांत्रिकी ही दोन क्षेत्रे सर्वस्वी भेदहीन आहेत असा मात्र याचा अर्थ नाही. किंबहुना वैज्ञानिक व अभियंता यांच्या कार्यप्रणाली एकमेकापासून आमूलाग्र भिन्न असतात. एखादी गोष्ट साध्य कशी करावी हे शोधून काढण्याचे मूळ काम वैज्ञानिकाचे असते, तर प्रत्यक्ष परिस्थितीत त्या गोष्टी संपादन करण्याची जबाबदारी अभियंत्याची असते. व्यावहारिकदृष्ट्या, अभियंत्याची जबाबदारी वैज्ञानिकाहून खूपच जास्त असते. त्याला वैज्ञानिकाइतके अमूर्त उपपत्तींवर विसंबून चालत नाही. पूर्वानुभवावरून चालत आलेल्या प्रथांच्या सहाय्याने त्याला काम करावे लागते, त्याचबरोबर नवीन कल्पनांची चाचणी घेऊन त्यांची व्यावहारिक शक्याशक्यताही अजमावून पहावी लागते. किंबहुना अभियांत्रिकीच्या काही क्षेत्रामध्ये तर अजूनही पूर्वानुभवाच्या मानाने विज्ञानाला दुय्यम दर्जाची भूमिका दिली जाते. जहाजांच्या इंजिनात व नियंत्रण यंत्रणेत खरे म्हणजे आज कितीतरी वैज्ञानिक साधने वापरली जातात. परंतु आजही जुन्या जहाजबांधणीबद्दलच्या तंत्रानुभवावर अवलंबून असलेले कारागीरच नवीन जहाजे बांधतात असे दिसून येते. या कारणाने, झाडाच्या एका खोडातून खोदून तयार केलेल्या पुरातन काळच्या नौकेपासून आजच्या आधुनिक अवाढव्य बोटींपर्यंत जहाज बांधणीची एकच अखंड तंत्रपरंपरा चालू आहे असे म्हणता येईल. कोणत्याही तंत्रपरंपरेचा विशेष म्हणजे ती कधी अपयशी ठरत नाही. पूर्वी जर ती सफल झाली असेल तर ती पुन्हाही सफल होण्याचा दाट

संभव असतो. याचबरोबर तिचा एक दोष म्हणजे, ती रुळलेल्या, साचेबंद मार्गापासून कधी बाजूला होऊ शकत नाही. अभियांत्रिकीपासून, तंत्रपद्धति व तंत्रकौशल्य यात संथ व संचित सुधारणा होण्याची अपेक्षा धरता येते. परंतु तंत्रविषयक उल्लेखनीय बदल तेव्हाच होऊ शकतात जेव्हा विज्ञानाचा त्या क्षेत्रात संचार होतो. प्रसिद्ध शास्त्रज्ञ जे. जे. थॉमसन् यांनी म्हटल्याप्रमाणे, 'उपयोजित विज्ञानसंशोधनाने सुधारणा घडतात. परंतु मौलिक विज्ञान-संशोधनाने मात्र क्रांति घडते.' तरीसुद्धा, अभियांत्रिकी क्षेत्रातील सिद्धींमुळे आणि विशेषतः अडचणींमुळे विज्ञानाला सतत नवीन संधी व समस्या प्राप्त होत असतात. विज्ञान व अभियांत्रिकी यांच्या भूमिका व कार्यक्षेत्रे एकमेकास निबद्ध व पोषक असल्यामुळे दोन्हीही विषयांच्या अभ्यासाशिवाय यातील कोणत्याही एकाचे सामाजिक परिणाम समजणे शक्य होणार नाही.

(या विषयावरील पहिला लेखांक मे १९७७ च्या अंकात प्रसिद्ध झाला होता.)

◆ ◆ ◆



अनुक्रमणिका

डॉ. शं. गो. तुळपुळे

# मराठी ‘ शुकबाहात्तरी ’ चा जर्मन अवतार

---

अव्वल इंग्रजीच्या काळात ‘ शुकबाहात्तरी ’ सारखे कथासंग्रह अतिशय लोकप्रिय झाले होते. सर अलेक्झांडर ग्रँट यांनी इ. स. १८६७ मध्ये प्रसिद्ध केलेल्या ‘ कॅटॅलॉग ऑफ् नेटिव पब्लिकेशन्स ’ ला जोडलेल्या लेखात न्या. रानडे म्हणतात—

“ चोपाख्यान, वेताळपंचविशी, सिंहासनबत्तिसी and शुकबाहात्तरी—

These four constitute the stock of the most popular stories of fiction in the language. They are to be found in every indigenous school and constitute their whole library. ”

वरील उल्लेखातील ‘ शुकबाहात्तरी ’ म्हणजे ‘ शुकसप्तति ’ या संस्कृत ग्रंथाचा मराठी अनुवाद असून या मूळ ग्रंथाचा अभ्यास करणाऱ्यांत मागील शतकातील प्रसिद्ध जर्मन पंडित डॉ. रिचर्ड श्मिड्ट ( Schmidt ) हे प्रमुख होत. त्यांनी प्रथम इ. स. १८९० मध्ये ‘शुकसप्तती’ मधील चार कथांचा जर्मन अनुवाद ( Vier Erzählungen aus der Cukasaptati ) प्रसिद्ध करून त्याला लिहिलेल्या प्रस्तावनेत ‘शुकसप्तती’ च्या आधुनिक भारतीय भाषांतील ज्या अनुवादांचा परिचय करून दिला त्यांत ‘शुकबाहात्तरी’ या नावाचा एक मराठी अनुवादही होता. या मराठी अनुवादाचा उल्लेख बोटलिंक यांनी Indische Sprüche ( भारतीय सुभाषिते ) मध्ये केलेला असला तरी तो नाममात्र असून या अनुवादाची एक छापील प्रत ( इ. स. १८६२ ) डॉ. श्मिड्ट यांना प्रो. कुन्ह यांच्याकडून मिळाली, तिच्यात पुढील मजकूर होता :—

न. भा. ३

अनुक्रमणिका







"ही शुकबाहात्तरी। लोकपरिज्ञानार्थ। मुक्काम पुणें। पेठ बुधवार येथें। पांडुरंग विठ्ठल रानडे याणी आपले बुद्धिप्रकाश छापखान्यात छापून प्रसिद्ध केली असे। सन १८६२ इ। शालिवाहन शके १७८४। दुंदुभिनाम संवत्सरे आश्विन वद्य १३ सोमवारीं समाप्त। विक्रम संवत् १९१८।"

वरील M प्रत मिळाल्यानंतर काही दिवसांनी त्यांना शुक० च्या मराठी अनुवादाची आणखी एक छापील प्रत (इ. स. १८४९) मिळाली व तिचा परिचय डॉ. श्मिड्ट यांनी पुढे इ. स. १८९३ मध्ये प्रसिद्ध केलेल्या संस्कृत 'शुकसप्तती'च्या Textus Simplicior च्या प्रस्तावनेत करून दिला. ही आवृत्ती प्रथम लाइप्झिग् येथून इ. स. १८९३ मध्ये प्रसिद्ध झाली व सुमारे दहा वर्षांपूर्वी म्हणजे १९६६ मध्ये, तिचे पुनर्मुद्रण क्राउस री-प्रिंट लि० या प्रकाशनसंस्थेने केले. या आवृत्तीमधील M–1 या मराठी अनुवादित प्रतीचा परिचय असा :—

"शुकबाहात्तरी मुक्काम इंदूर येथे। महाराज होळकर साहेब बहादुर याचे छापखान्यांत छापिली असे। सन १८४९। शके १७७१॥"

या छापील प्रतीची एकूण १०८ पृष्ठे असून तिच्यात 'शुकबाहात्तरी'ची मुख्य नायिका प्रभावती हिला शुक कथा सांगत आहे असे वुडकट्, म्हणजे लाकडी ठोकळ्यांच्या साधनाने छापलेले एक चित्र आहे. सारांश, संस्कृत 'शुकसप्तती'चा अभ्यास करताना डॉ. श्मिड्ट यांच्या हाती त्या ग्रंथाच्या मराठी अनुवादाच्या, म्हणजे 'शुकबाहात्तरी'च्या दोन छापील आवृत्त्या आल्या. पैकी एक (M) पुणे येथे इ. स. १८६२ मध्ये छापलेली असून दुसरी (M–1) इंदुरात इ. स. १८४९ मध्ये छापलेली होती. या दोन आवृत्त्यांमध्ये "आशयाच्या दृष्टीने विशेष फरक नसला तरी बाह्य गोष्टींत त्या एकमेकींहून काहीशा भिन्न" असल्याने त्या दोहोंच्या आधारे डॉ. श्मिड्ट यांनी या मराठी 'शुकबाहात्तरी'ची एक सटीप व सानुवाद आवृत्ती लाइप्झिग् येथून इ. स. १८९७ मध्ये प्रसिद्ध केली. तिचे पुनर्मुद्रण इ. स. १९६६ मध्ये क्राउस रीप्रिंट लि० या प्रकाशन-संस्थेने केले आहे. ही आवृत्ती जर्मन भाषेत असून तिचे टायटल-पेज पुढीलप्रमाणे आहे :—

शुकबाहत्तरी

DIE
MARATHI - UEBERSETZUNG
DER
ŚUKASAPTATI
MARATHI UND DEUTSCH
VON
RICHARD SCHMIDT
Leipzig, 1897

डॉ. श्मिड्ट यांनी वरील आवृत्ती प्रो. ई. कुन्ह यांना अर्पण केली असून तिची योजना पुढीलप्रमाणे आहे :–

(१) Vorwort (Foreword) ... पृ. vii–viii
(२) मराठी 'शुकबाहत्तरी' (देवनागरी) पृ. १–८४
(३) Uebersetzung (जर्मन अनुवाद) पृ. ८७–१४५
(४) Anmerkungen (टीपा) पृ. १४९–१७२
(५) Versverzeichniss (श्लोकसूची) पृ. १७३–१७५

डॉ. श्मिड्ट यांच्या 'शुकबाहात्तरी'च्या वरील आवृत्तीचा उल्लेख फक्त दाते–सूची करते. अर्थात् सूचिकार दाते यांनी ती पाहिलेली असणारच. त्यांच्याशिवाय मात्र कोणीही ती पाहिलेली दिसत नाही. म. म० पोतदार, प्रा. सरदार, डॉ. अ. ना. देशपांडे किंवा म. सा. परिषदेच्या 'मराठी वाङमयाचा इतिहास, खंड ४ था' याचे लेखक यांपैकी कोणीही डॉ. श्मिड्ट यांच्याच काय पण त्यांनी वापरलेल्या मराठी 'शुकबाहत्तरी'च्या दोन प्रतींपैकी कोणत्याही प्रतीचा उल्लेख करीत नाहीत. एकूणच वरील सर्व वाङमयेतिहासकार या एका काळी लोकप्रिय असलेल्या कथासंग्रहाचा उल्लेख केवळ नाममात्र करताना दिसतात. म्हणून या मराठी ग्रंथाच्या जर्मन अवताराची कल्पना मराठीच्या अभ्यासकांना यावी या हेतूने त्याचा परिचय पुढे करून देत आहे. प्रथम डॉ. श्मिड्ट यांनी या ग्रंथास लिहिलेल्या जर्मन भाषेतील प्रस्तावनेचा मराठी अनुवाद दिला असून नंतर मूळ ग्रंथाचे पहिले पृष्ठ (यात मूळ प्रस्ता-

घना व पहिल्या कथेची सुरवात आली आहे. ), त्या पृष्ठातील M व M –1 या दोन आवृत्त्यांमधील पाठभेदांचे टिपण, आणि शेवटी त्या पृष्ठातील मजकुराचे जर्मन भाषान्तर इतका भाग नमुना म्हणून दिला आहे. पैकी डॉ. श्मिड्ट यांची स्वतःची प्रस्तावना त्यांच्या सखोल व चिकित्सक अभ्यासाची साक्ष देणारी असून त्यांनी संस्कृतबरोबर मराठी भाषेचाही बारकाईने अभ्यास केला होता हे ती वाचली असता दिसते. मात्र या दोन आवृत्त्यांमध्ये "मराठीच्या 'कोकण' व 'देश' या दोन प्रमुख बोलींचे मिश्रण झाले असण्याची शक्यता आहे" हा त्यांनी काढलेला निष्कर्ष बरोबर नसण्याची शक्यता अधिक आहे. 'शुकबाहत्तरी'मधील मराठी कथांचे आपण केलेले जर्मन भाषांतर 'विश्वसनीय' असल्याची ग्वाही देऊन त्याचे स्वागत 'स्नेहभावाने' व्हावे अशी इच्छा त्यांनी व्यक्त केली आहे. पण त्याच बरोबर "जें होणार तें चुकत नाही" असे शेवटी शुद्ध मराठीत 'निश्चितपणे' सांगून त्यांनी ही प्रस्तावना संपवली आहे.

## प्रस्तावना ( मराठी अनुवाद )

'शुकसप्तती'चा मराठी अवतार मला चमत्कृतिपूर्ण कथावाङ्मयाच्या – ( Märchenlitteratur ) दृष्टीने इतका महत्त्वाचा वाटतो, की युरोपमध्ये दुर्मिळ असलेल्या त्याच्या प्रतीची एक भाषान्तरयुक्त आवृत्ती काढणे हे निश्चितपणे अप्रस्तुत होणार नाही. साहजिकच मुख्य लक्ष भाषान्तरावर असून मूळ पाठ तो भाषान्तराशी ताडून पहाण्याची सोय व्हावी म्हणून दिला आहे. तरीसुद्धा तो देताना भाषान्तराइतकीच काळजी घेतली आहे. कारण, मूळ पाठाच्या दोन भारतीय आवृत्त्या माझ्या हाती आल्या व त्या दोहींत आशयाच्या दृष्टीने विशेष फरक नसला तरी बाह्य गोष्टीत त्या एकमेकींहून काहीशा भिन्न आहेत. या दोन प्रतींविषयी ( M आणि M– 1 ) अधिक तपशीलवार माहिती मी माझ्या डॉक्टरेटच्या प्रबंधात पृ. ५–६ वर आणि माझ्या 'शुकसप्तती' च्या आवृत्तीमध्ये ( Textus Simplicior, S. VIII ) दिली आहे. या दोन्ही प्रतीत व्याकरणविषयक व लेखनविषयक वैशिष्टये भरपूर असून त्यामुळे ती वैशिष्टये तशीच ठेवावी की गाळून टाकावी याविषयी शंका निर्माण झाली. प्रथम मला असे वाटले की त्यांत ( मराठी भाषेच्या ) कोणत्या तरी एका बोलीचा वापर केलेला आहे व ती बोली म्हणजे कोकणची बोली होय असा निर्णय मी करणार होतो. पण ( त्या दोन प्रतींची ) अधिक बारकाईने तुलना केल्यावर असे दिसून आले की त्यांत मराठीच्या 'कोकण' व

'देश' या दोन प्रमुख बोलींचे मिश्रण झाले असण्याची शक्यता आहे. विशेषत: संबद्ध शब्दरूपांत या दोन प्रतींत दिसून येणारा फरक पाहून माझी तशी खात्री झाली. उदाहरणार्थ, 'म्हणोन' सारखी कोकणीत विशेषत्वाने दिसणारी धातुसाधिते दोन्ही प्रतींत आहेत. पण M प्रतीत सर्वत्र 'दिवशीं' असे रूप असून तेच M 1 या प्रतीत 'दिवसीं' असे आहे. अशा स्थळी टीपांत बरोबर माहिती दिली आहे. येथे हे सांगितले पाहिजे की 'करिती' या ऐवजी 'करिते' यासारखी रूपे माझ्याकडून दिलेली नसून ती मूळ पाठातच तशी आहेत. कदाचित् 'करिते' हा 'करित्थे' यातील मुद्रणदोषही असावा.

मूळ पाठात सुधारणा (की कुधारणा?) करावयाची नाही या हेतूने मी M प्रतीचा पाठ देताना तिचे सर्व विशेष कायम ठेवले आहेत. अर्थात् उघड दिसणारे मुद्रणदोष मात्र सुधारून घेतले आहेत. त्यांची तशी नोंद मात्र केलेली नाही. तसेच M प्रतीच्या पाठांची M 1 प्रतीच्या पाठांशी सतत तुलना करून त्यांतून काही चांगले पाठभेदही दिले आहेत.

मुळात (कथारंभीच्या) संस्कृत श्लोकांचा मराठीत दिलेला अर्थ मी प्रस्तुत आवृत्तीत वगळला आहे. माझे हे भाषान्तर शब्दश: केलेले असून ते विश्वसनीय आहे अशी मी खात्री देऊ शकतो. त्याचे स्वागत स्नेहभावाने व्हावे अशी माझी इच्छा आहे. पण शेवटी निरिच्छपणे मी इतकेच म्हणेन की

जें होणार तें चुकत नाहीं !

आइस्लेबन
दि. १४ ऑगस्ट १८९७

रिचर्ड श्मिड्ट

अनुक्रमणिका








शुकबाहत्तरी, पृ. १ श्री प्रस्तावना

पूर्वीं चंद्रकला नगरीचे ठायीं विक्रमसेन राजा राज्य करीत असतां तेथें कोणीएक हरिदत्त नामें सावकार राहत होता, त्याची स्त्री श्रृंगारसुंदरी व पुत्र मदन व पुत्राची स्त्री प्रभावती, ती सोमदत्त सावकाराची कन्या होती. मदन स्वस्त्रीचेठायीं आसक्त होऊन व्यवहाराचा त्याग करिता झाला; त्याणें व्यवहाराविषयीं दक्षता धरावी, यास्तव त्याचा मित्र त्रिविक्रम याणें विदग्धचूडामणि यानामें शुक व मालती नामें मैना याप्रमाणें दोन पक्षी मदनास आणून दिले. नंतर हरिदत्त सावकार याणें व्यवहार मनास आणावयाविषयीं पुत्रास बहुत उपदेश केला. तेणेंकरून पुत्र क्रोधयुक्त होऊन त्याचे वचनाचा त्याग करिता झाला आणि अनादरही केला. हें पाहून एके दिवशीं विदग्धचूडामणि रांवा मदनाप्रत बोलत आहे : ,, हे मदना ! मातापिता वृद्ध तुझे हिताचा उपदेश तुला करीत असतां त्यांची अवगणना करितोस, हें तुला उचित नाहीं. या पातकेंकरून देवशर्मा ब्राह्मण याची अवस्था कशी घडली ती कथा तुजला सांगतों, श्रवण करावी.

कथा १.

पूर्वीं पंचपुर नामें नगर होतें, तेथें सत्वशर्मा नामें एक ब्राह्मण राहत होता, त्याची स्त्री धर्मशीला, आणि पुत्र देवशर्मा; तो पित्यापासून विद्याभ्यास करून गर्वास्तव मातापिता यांचा अनादर

पाठभेद–टिप्पण

*Seite* (= पृष्ठ) *1*, *Z*. (*Zeile*= ओळ). *2*

M–1 विक्रम सैन्य. Z. 3 M–1 om कोणी एक; om. राहत होता; सावकार याची. Z. 5 M–1 om. होती; असे असता स्व० मदन. Z. 6 M जाहला. Z. 8 M–1 मैना दोनी आणून मदनास दिधलीं. Z. 10 M–1 पुत्रास खेद होऊन. Z. 12 MM–1 दिवशीं; M–1 राव. Z. 13 M–1 o प्रत असें. Z. 14 M–1 तुजला. Z. 16 M–1 om कशी; ही सांगतों. Z. 18 M–1 चंपपुर एक नगर. MM–1 सप्तशर्मा; M–1 om नामें एक. Z. 19 M–1 om. राहत होता; धर्मशीळा. Z. 20 M–1 मातापितरांचा.

## (पहिल्या पृष्ठाचे जर्मन भाषांतर)

### Einleitung (प्रस्तावना) पृ. १

Einst lebte in der Stadt Candrakala, als Konig Vikramasena die Herrschaft fuhrte, ein Kaufherr namens Haridatta; dessen Frau hiess Srngarasundari, sein Sohn Madana und des Sohnes Frau Prabhavati, die Tochter des Kaufherrn Somadatta. Madana, der in seine Frau verliebt war, begann sein Geschaft zu vernachlassigen :

um ihm nun Sinn fur dasselbe beizubringen, schenkte ihm sein Freund Trivikrama zwei Vogel, einen Papagei nemens Vidagdhacudamani und eine Predigerkrahe mit Namen Malati, diese Beiden. Nun gab der Kaufherr Harldalta seinem Sohne viele Lehren, um ihm Lust zum Geschafte einzuflossen; aber dadurch ward der Sohn zornig, horte nicht auf seine Worte und verachtete sie. Eines Tages sprach der Papagei Vidagdhacudamani, der dieses sah, zu Madana : "He Madana, wahrend deine alten Eltern dir zu deinem Besten Lehren geben, verachtest du dieselben : das ist nicht recht von dir. Was wegen solcher Sunde dem Brahmanen Devasarman passirte, diese Geschicte will ich dir erzahlen; hore zu.

### Erzahlung 1 (कथा १)

Es war einmal eine Stadt mit Namen Panchpura da wohnte ein Brahmane namens Satyasarman; dessen Frau war Dharmasila und sein Sohn Devasarman. Nachdem dieser von seinem Vater in den Wissenschaften.

(टीप : प्रस्तुत लेखकाला जर्मन भाषा अवगत नसल्याने वरील लेखाच्या कामी पुण्यातील डॉ. मॅलिसन व डॉ. रा. ना. दांडेकर यांचे साहाय्य घ्यावे लागले व ते त्यांनी आनंदाने दिले.)



डॉ. के. वा. आपटे

# विद्यारण्यकृत पंचदशीची घटना

आद्य शंकराचार्यांनी श्रुतीच्या आधाराने केवलाद्वैतमताची प्रतिष्ठापना केली. त्यांच्यानंतरच्या काळात, वेदान्ताच्या या केवलाद्वैत संप्रदायात जे अनेक महान् ग्रंथकार होऊन गेले, त्यामध्ये विद्यारण्य[1] हे एक होते. त्यांच्या नावावर अनेक ग्रंथ दिले जातात; त्यांमध्ये पंधरा प्रकरणे अंतर्भूत असणारा पंचदशी नावाचा केवलाद्वैतावरचा ग्रंथ आहे. या ग्रंथाला कधी वेदान्तपंचदशी असेही म्हटले जाते. या ग्रंथात ग्रंथकार म्हणून मात्र विद्यारण्यांचे नाव कुठेच येत नाही.

## पंचदशीचे भिन्न कर्तृत्व

पंचदशी हा ग्रंथ संपूर्णपणे विद्यारण्यांनी रचला होता की नाही, अशी शंका पूर्वीच निर्माण झाली होती असे दिसते. कारण किमान तीन टीकाकार तरी पंचदशी ही एककर्तृक नाही असे म्हणताना दिसतात. अच्युतराय नावाचा टीकाकार सांगतो की पंचदशीची पहिली सहा प्रकरणे विद्यारण्याची असून, उरलेली नऊ प्रकरणे विद्यारण्यांचे गुरु भारतीतीर्थ यांनी[2] रचली. तर पंचदशीची पहिली दहा प्रकरणे विद्यारण्यांनी रचली व उर्वरित पाच प्रकरणे भारतीतीर्थांची आहेत, असे निश्चलदास नावाचा टीकाकार म्हणतो. रामकृष्ण या टीकाकाराने पंचदशीवरील आपल्या टीकेत, प्रत्येक प्रकरणारंभी प्रास्ताविकवजा काही वाक्ये[3] लिहिली आहेत. त्यात कधी कर्ता न सांगता तो नुसते क्रियापद वापरतो. उदा. सूचयति (प्रकरण १ ), प्रतिजानीते (प्र. २, ४, ६, ९), आह (प्र. ५, १०); दोनदा त्याने आचार्य हे कर्तृपद वापरले आहे. उदा.– आचार्यः ...... प्रतिजानीते ( प्र. ३ ); आचार्यः ...... निर्दिशति (प्र. ८); आणि प्रकरण ७ हे भारतीतीर्थांचे आहे असे रामकृष्ण सांगतो ( तृप्तिदीपाख्यं प्रकरणं आरभमाणः श्रीभारतीतीर्थगुरुः ...... पठति । तृप्तिदीप हे सातव्या प्रकरणाचे नाव आहे ). मग रामकृष्णाच्या मते, इतर प्रकरणे कुणाची आहेत ? आचार्य शब्दाने त्याला

कोण अभिप्रेत आहे ? इतर प्रकरणांचा परंपरानिर्दिष्ट कर्ता विद्यारण्य त्याला मान्य आहे की नाही ? या प्रश्नांची उत्तरे मिळत नाहीत. तथापि रामकृष्णाच्या प्रत्येक प्रकरणारंभीच्या मंगल श्लोकात भारतीतीर्थ आणि विद्यारण्य यांना नमस्कार आहे ( नत्वा श्रीभारतीतीर्थविद्यारण्यमुनीश्वरौ। ). त्यावरून विद्यारण्याचा पंचदशीत काही भाग असावा हे त्याला मान्य असावे असे दिसते.

आता, पंचदशीचे भिन्नकर्तृत्व या टीकाकारांनी कशाच्या आधारावर सांगितले आहे, हे कळण्यास मार्ग नाही. तरी एक कारण सुचविता येते ते असे :– या टीकाकारांना पंचदशी हा ग्रंथ एकसंध वाटला नाही; आणि पंचदशी हा ग्रंथ एकसंध कसा नाही, याचीच चर्चा प्रस्तुत लेखात केली आहे.

## पंचदशीचे विभाग

पंचदशीची पंधरा प्रकरणे काहीजण पुढील तीन विभागात विभागतात :–

(१) प्रकरणे १–५ :– यामध्ये जीव, ब्रह्म व जग यांचे स्वरूप, जगाचे मिथ्यात्व, आणि जीव–ब्रह्माचे ऐक्य वर्णिले आहे. (२) प्रकरणे ६–१० :– विचाराने प्राप्त होणाऱ्या ज्ञानाचे विवेचन येथे आहे. (३) प्रकरणे ११–१५ :– यात ज्ञानप्राप्तीने होणाऱ्या आनंदाचे विवरण आहे.

वरील विभागणी सर्वांशाने बरोबर नाही. भगवद्गीतेच्या अठरा अध्यायांच्या तीन अध्याय–षट्कातील विभागणीप्रमाणे ही विभागणी बऱ्याच प्रमाणात कृत्रिम आहे. प्रकरणसंख्येचा निकष लावून पहिले दोन विभाग केलेले दिसतात.

पंचदशीच्या पंधरा प्रकरणांपैकी शेवटची ११–१५ ही प्रकरणे अगदी वेगळ्या स्वरूपाची आहेत. किंबहुना ती पांच प्रकरणे मिळून एक स्वतंत्र ग्रंथच आहे. त्यामुळे पंचदशीची पहिली दहा प्रकरणे व शेवटची पाच प्रकरणे असे दोन मुख्य भाग पंचदशीचे पडतात आणि त्या दोन्ही भागांचा आता पुढे स्वतंत्रपणे विचार केला आहे.

## ११–१५ प्रकरणे हा स्वतंत्र ग्रंथ आहे

अकरा ते पंधरा या पंचदशीच्या अंतिम प्रकरणातील अंतर्गत उल्लेखांवरून ही पाच प्रकरणे म्हणजे एक स्वतंत्र व स्वयंपूर्ण ग्रंथ आहे, हे स्पष्ट होते. प्रकरण ११ च्या पहिल्या श्लोकात, 'ब्रह्मानन्दं प्रवक्ष्यामि' ( ११.१ ) असे शब्द आहेत ( येथे रामकृष्णाच्या मते, ब्रह्मानंद या विषयाची चर्चा करणाऱ्या ग्रंथाचे[४] 'ब्रह्मानंद हे नाव आहे ); याच प्रकरणाच्या अंतिम श्लोकात, ब्रह्मानंद नावाचा ग्रंथ व त्याचा पहिला अध्याय असा निर्देश आहे ( ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे

ब्रह्मानंदप्रकाशकम् । योगिप्रत्यक्षमध्याये प्रथमेऽस्मिन्नुदीरितम् ॥ ११.१३४ ). बाराव्या प्रकरणाच्या शेवटी, ब्रह्मानंद नामक ग्रंथाचा दुसरा अध्याय असा उल्लेख आहे ( ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे मन्दानुग्रहसिद्धये । द्वितीयाध्याय एतस्मिन्नात्मानंदो विवेचितः ॥ १२.९० ). तेराव्या प्रकरणाच्या प्रारंभी, मागील अध्यायांची संगति दाखविण्यास, 'योगानंदः पुरोक्तो यः स आत्मानंद इष्यताम् ।' १३.१, असे शब्द असून, शेवटच्या श्लोकात, ब्रह्मानंद नावाच्या ग्रंथाचा तिसरा अध्याय, असे म्हटले आहे ( ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे तृतीयोऽध्याय ईरितः । १३.१०५ ). चौदाव्या प्रकरणाच्या सुरवातीला 'अथ विद्यानन्दो निरूप्यते' ( १४.१ ), असे सांगून, अंतिम श्लोकात, ब्रह्मानंद नावाच्या ग्रंथातील चौथा अध्याय असे म्हटले आहे ( ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे चतुर्थोऽध्याय ईरितः । १४.६५ ). पंधराव्या प्रकरणाच्या पहिल्या श्लोकात, आता विषयानंदाचे निरूपण केले जात आहे असे सांगून ( अथात्र विषयानंदो ब्रह्मानंदांशरूपभाक् । निरुप्यते ॥ १५.१ ), उपान्त्य श्लोकात ब्रह्मानंद ग्रंथातील पाचवा अध्याय असा निर्देश आहे ( ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे पंचमोऽध्याय ईरितः । १५.३४ ); आणि अंतिम श्लोकात[5] समारोप आहे; येथेही ११.१ मधील ब्रह्मानंद शब्दाप्रमाणे ब्रह्मानंद हा शब्द ग्रंथनाम दिसतो.

या पाच अध्यायांचा परस्परसंबंधही या ग्रंथातील उल्लेखावरून स्पष्ट होतो : अकराव्या प्रकरणात ( = ब्रह्मानंदाच्या पहिल्या अध्यायात ) आनंदाचे तीन प्रकार– ब्रह्मानंद, विद्यासुख ( = विद्यानंद ), आणि विषयानंद ( ११.११ ) –दिलेले आहेत. ११.८८ मध्ये ब्रह्मानंदाचा उल्लेख आहे ( ब्रह्मानंदः स्वयंप्रभः । ); हा योग्यांना गम्य असल्याने त्यालाच योगिप्रत्यक्ष ( ११.१३४ ) म्हटले आहे; आणि ते 'ब्रह्मानंद–प्रकाशक' ( ११.१३४ ) आहे. थोडक्यात म्हणजे योग्याला प्राप्त होणारा आनंद म्हणजे योगानंद हाच ब्रह्मानंद आहे, म्हणजे अकराव्या प्रकरणात योगानंद = ब्रह्मानंद वर्णिला आहे. आता ब्रह्म = आत्मा असल्याने, आत्मानंद या नावाखाली ब्रह्मानंदाचेच विवरण दुसऱ्या अध्यायात ( = बाराव्या प्रकरणात ) आहे. ब्रह्म हे अद्वैत आहे; म्हणून अद्वैतानंद या नावाखाली ब्रह्मानंदाचे विवेचन तिसऱ्या अध्यायात ( = तेराव्या प्रकरणात ) येते. अशाप्रकारे, ब्रह्मानंदग्रंथाच्या १–३ अध्यायांत ( = ११ ते १३ प्रकरणात ) ब्रह्मानंदाचेच वर्णन वेगवेगळ्या नावाखाली झाले आहे. उरलेल्या दोन अध्यायात, विद्यासुख ( = विद्यानंद ) ( अध्याय ४ = प्रकरण १४ ) आणि विषयानंद ( अध्याय ५ = प्रकरण १५ ) यांचे विवेचन येऊन जाते.

येथे कुणाला अशी शंका येईल की या ग्रंथाला आनंद हे नांव शोभले असते; मग ब्रह्मानंद हे नाव का दिले गेले ? याचे उत्तर ब्रह्मानंदकाराला पुढील-प्रमाणे अभिप्रेत दिसते:– विद्यानंद हा विषयानंदाप्रमाणेच बुद्धि–वृत्ति स्वरूपाचा आहे ( विषयानंदवत् विद्यानंदो धीवृत्तिरूपकः। १४.२ ); आणि विषयानंद हा गुणतः ब्रह्मानंदापेक्षा फारसा वेगळा नाही; तो ब्रह्मानंदाच्या अंशरूपाचा वाटेकरी आहे (विषयानन्दो ब्रह्मानन्दांशरूपभाक्। १५.१). म्हणजे आनंदाचे जरी तीन भाग असले तरी ते ब्रह्मानंदाच्याच अंशस्वरूपाचे वाटेकरी आहेत. म्हणून ब्रह्मानंद हे या ग्रंथाचे शीर्षक अयोग्य ठरत नाही.

वरील अंतर्गत पुराव्याला आनुषंगिक असेच रामकृष्णटीकाकाराचे म्हणणे आहे: ११.१ मधील ब्रह्मानंद हा शब्द ग्रंथवाचक आहे, या त्याच्या म्हण-ण्याचा उल्लेख मागे आला आहे ( तळटीप ४ पहा ). हा ब्रह्मानंद ग्रंथ पाच अध्यायांनी बनला आहे असे तो सांगतो ( ब्रह्मानंदनामके अध्यायपंचात्मके ग्रंथे अस्मिन्। ११. १३४ वर रामकृष्ण ). त्यामुळे या संपूर्ण ग्रंथासाठी रामकृष्णाने आपला एकच मंगल श्लोक[६] पहिल्या अध्यायाच्या ( = ११ व्या प्रकरणाच्या ) आरंभी देऊन, 'चिकीर्षित– ग्रंथस्य ... ग्रंथारंभं प्रतिजानीते,' असे प्रास्ताविक शब्द त्याने उपयोजिले आहेत. येथे एक गोष्ट आवर्जून लक्षात घेतली पाहिजे की नंतर २–५ अध्यायांच्या ( = १२–१५ प्रकरणांच्या ) आरंभी तो पुनः[७] मंगल करीत नाही. बाराव्या प्रकरणाला तो ब्रह्मानंदग्रंथातील दुसरा अध्याय म्हणतो ( अथ ब्रह्मानन्दान्तर्गतं आत्मानंदनामक-द्वितीयाध्यायं आरभते। ). तेराव्या प्रकरणाच्या ( = ३ ऱ्या अध्यायाच्या ) आरंभी तो मागील दोन अध्यायांची संगति कशी सांगितली आहे याचा निर्देश[८] करतो. चौदाव्या प्रकरणाच्या ( = चौथ्या अध्यायाच्या ) सुरवातीला, 'आता मागील–पुढील ग्रंथाचा संबंध सांगितला आहे,' असे तो म्हणतो ( इदानीं वृत्तवर्तिष्य-माणयोः ग्रंथयोः संबंधं आह। ). आणि पंधराव्या प्रकरणाच्या ( = पाचव्या अध्यायाच्या ) प्रारंभी तो लिहितो– पंचमाध्यायस्य प्रतिपाद्यं अर्थं आह।

वर मांडलेल्या पुराव्यावरून पुढील निष्कर्ष निघतात:– ( १ ) सध्याच्या पंचदशीची ११–१५ प्रकरणे ही पंचदशीचे घटक नसून, ब्रह्मानंद नावाच्या स्वतंत्र ग्रंथाचे घटकभूत अध्याय आहेत. ( २ ) म्हणूनच या पाच घटकांना ब्रह्मानंद ग्रंथाचे पाच अध्याय असे म्हटले आहे. ( ३ ) ब्रह्मानंद या ग्रंथाच्या नावाचा अनेकदा स्पष्ट निर्देश आहे.

हे पाच अध्याय ( = प्र. ११–१५ ) मिळून एकच ग्रंथ होत असल्याने, रामकृष्ण टीकाकाराने प्रत्येक अध्यायाच्या प्रारंभी स्वतंत्र मंगल न देता, फक्त पहिल्या अध्यायाच्या ( = ११ व्या प्रकरणाच्या ) सुरवातीला एकदाच आपले मंगल केले आहे.

साहजिकच, पाच अध्यायांनी ( = सध्याच्या पंचदशीची ११–१५ प्रकरणे ) युक्त असा ब्रह्मानंद नावाचा निराळाच ग्रंथ होता; व तो नंतर केव्हा-तरी पंचदशीच्या पहिल्या १० प्रकरणांना जोडला गेला, असे अनुमान स्पष्ट-पणाने करता येते.

## पंचदशीची पहिली १–१० प्रकरणे

सद्यःकालीन पंचदशीच्या पहिल्या दहा प्रकरणांकडे पाहिल्यास, त्यांचे पुढील चार भाग होतात असे दिसून येते :– १ प्रकरणे १–४ :– यांमध्ये काही विशिष्ट हेतूंनी काही पदार्थांचा विवेक केलेला आहे. उदा– सुखाने बोध व्हावा म्हणून पहिल्या प्रकरणांत तत्त्वाचा विवेक आहे ( सुखबोधाय तत्त्वस्य विवेकोऽयं विधीयते । १.१ ). पंचभूतांच्या विवेकाने अद्वैत जाणणे शक्य असल्याने, पंचभूतांचा विवेक दुसऱ्या[९] प्रकरणात आहे. गुहाहित ब्रह्माचा बोध व्हावा म्हणून पंचकोशांचा विवेक तिसऱ्या[१०] प्रकरणात केलेला आहे. बंधाचा त्याग व्हावा म्हणून चौथ्या[११] प्रकरणात द्वैताचा विवेक आहे. तसेच, या चारही प्रकरणांच्या अंती फलश्रुति[१२] सांगितलेली आहे. ( २ ) प्रकरण ५ :– यामध्ये उपनिषदांनी सांगितलेल्या चार महावाक्यांतील शब्दांचा अर्थ स्पष्ट केलेला आहे. या प्रकरणात मात्र अंती फलश्रुति दिलेली नाही. ( ३ ) प्रकरणे ६–९ :– या प्रकरणांत संकीर्ण विषयांचे विवेचन आहे. तसेच, प्रत्येक प्रकरणातील अंतिम श्लोकात विषयवाचक शब्दापुढे दीप शब्द असून, तेथे फलश्रुति[१३] सांगितली आहे. ( ४ ) प्रकरण १० :– यामध्ये नृत्यशालेतील दीपाच्या दृष्टान्ताने ( नृत्यशालास्थदीपवत् । १०।१० ) साक्षी हा प्रकाशक व प्रकाशमान असतो, असे सांगितले आहे. पण या प्रकरणात अंती फलश्रुति नाही.

आता प्रश्न असा की ही दहा प्रकरणे तरी पंचदशीचे अंगभूत घटक मानता येतील काय ? या प्रश्नाला उत्तर म्हणून कुणी म्हणेल की या प्रकरणांची शीर्षके व समाप्तिसूचके यांच्यावरून पंचदशीची एकसंधता ठरविता येईल. पण हे म्हणणे बरोबर नाही, हे पुढील परिच्छेदांवरून स्पष्ट होईल.

## १ ते १० प्रकरणांच्या शीर्षकांचा विचार

पंचदशीच्या मुद्रित ग्रंथात, एक ते दहा प्रकरणांना शीर्षके दिलेली आढळतात. पण ही शीर्षके मूळ ग्रंथकाराने दिलेली नसून, त्या त्या प्रकरणातील विषय किंवा काही शब्द अथवा रामकृष्ण टीकाकाराच्या मंगल श्लोकांतील शब्द, यांवरून नंतरच कुणीतरी बनविलेली आहेत; म्हणूनच क्वचित मुद्रित प्रतींतील शीर्षकात फरकही आढळतो. याचा अधिक खुलासा असा:–(१) पहिल्या प्रकरणातील 'तत्त्वस्यविवेक:' (१.२) आणि 'तत्त्वविवेकं' (१.६५) या शब्दांवरून पहिल्या प्रकरणाचे तत्त्वविवेक हे शीर्षक बनले (रामकृष्ण प्रत्यक्तत्त्वविवेकस्य असे शब्द वापरतो). (२) दुसऱ्या प्रकरणातील, 'पंचभूतविवेकत:' (२.१) व 'भूतपंचकं' (२.१) या शब्दांधारे 'पंचभूतविवेक किंवा 'महाभूतविवेक' (पहा– खेमराज श्रीकृष्णदास मुद्रित पंचदशी) हे दुसऱ्या प्रकरणाचे शीर्षक आले (पंचभूतविवेकस्य असा रामकृष्णाचा शब्द आहे). (३) तिसऱ्या प्रकरणातील 'पंचकोशविवेकत:' (३.१) व 'कोशपंचकं' (३.१) या शब्दांवरून पंचकोशविवेक हे शीर्षक दिले गेले (रामकृष्ण पंचकोशविवेकस्य असे शब्द उपयोगात आणतो). (४) चौथ्या प्रकरणातील 'द्वैतं विविच्यते' (४.१) आणि द्वैताद् विवेचितम् (४.६९) या शब्दांच्या आधारे द्वैतविवेक हे शीर्षक झाले (रामकृष्ण द्वैतविवेकस्य असे म्हणतो). (५) पाचव्या प्रकरणात, महावाक्य किंवा महावाक्यविवेक अथवा विवेक या अर्थाचे प्रतिशब्द नाहीतच. रामकृष्ण मात्र महावाक्यविवेक हा शब्द वापरतो (महावाक्यविवेकस्य कुर्वे व्याख्यां समासत:). रामकृष्णाच्या या शब्दाधारे महावाक्यविवेक हे शीर्षक बनले, हे स्पष्ट आहे. (६) सहाव्या प्रकरणात, 'चित्रपटे' (६.१), जगच्चित्रं (६.२८९), आणि चित्रदीपं (६.२९०) हे शब्द आहेत; त्यावरून चित्रदीप हे शीर्षक बनले (रामकृष्ण चित्रदीप शब्द वापरतो). (७) सातव्या प्रकरणातील तृप्ति: (७.२) व तृप्तिदीपं (७.२९८) शब्दावरून तृप्तिदीप शीर्षक आले (रामकृष्ण तृप्तिदीप शब्द उपयोजितो). (८) आठव्या प्रकरणात, कूटस्थभासित: (८.१) व कूटस्थदीपं (८.७६) हे शब्द आहेत; त्यांच्या आधारे कूटस्थदीप हे शीर्षक सिद्ध झाले (रामकृष्ण कूटस्थदीप हे शब्द वापरतो). (९) नवव्या प्रकरणातील ध्यानदीपं (९.१५८) शब्दावरून ध्यानदीप शीर्षक बनले (रामकृष्ण ध्यानदीप शब्द उपयोगात आणतो). (१०) दहाव्या प्रकरणात नाटक किंवा नाटकदीप हे शब्दच नाहीत; फक्त दीप शब्द आहे (१०.१०, ११, १४, १५). रामकृष्णाने मात्र नाटकदीप शब्द वापरला आहे; आणि

रामकृष्णाच्या त्या शब्दावरूनच नाटकदीप हे या दहाव्या प्रकरणाचे शीर्षक बनवण्यात आले आहे, हे अगदी उघड आहे.

या संदर्भात पुढील तीन गोष्टी लक्षात घेण्यास हरकत नाही. (१) दुसऱ्या प्रकरणाला पंचभूतविवेक किंवा महाभूतविवेक अशी दोन शीर्षके आढळतात. म्हणजे येथे शीर्षकाचे बाबतीत मतभेद झालेला दिसतो. (२) पाचव्या प्रकरणात महावाक्य हा शब्द किंवा विवेक वा तत्समानार्थी शब्द येत नाहीत हे वर सांगितले आहेच. खेरीज, या प्रकरणात महावाक्यातील शब्दांचे स्पष्टीकरण असल्याने, पहिल्या चार प्रकरणांच्या शीर्षकात ज्या अर्थाने विवेक शब्द वापरला आहे, तो अर्थ या प्रकरणाच्या शीर्षकातील विवेक शब्दाला येत नाही, हे स्पष्ट आहे. (३) दहाव्या प्रकरणात येणारा दीप शब्दही[१५] ६–९ प्रकरणांच्या शीर्षकात दीपचा जो अर्थ आहे त्या अर्थाने येत नाही. केवळ रामकृष्णाच्या नाटकदीप शब्दावरून या प्रकरणाचे शीर्षक बनविण्यात आले. खरे म्हणजे या प्रकरणातील नृत्यशालास्थदीपवत् (१०·१०) किंवा नृत्यशाला-स्थितो दीपः (१०·११) या शब्दांवरून नृत्यशालादीप असे शीर्षक बनविले जाण्यास हरकत नव्हती.

तेव्हा वरील चर्चेवरून लक्षात येते की पंचदशीच्या १–१० प्रकरणांची शीर्षके मूळ लेखकाची नव्हतीच. बहुधा ती मुद्रित पंचदशीच्या संपादकानी दिली असावीत. तेव्हा शीर्षकांच्या आधारे पंचदशीचे एकसंधत्व ठरविता येणार नाही. आणि ही प्रकरणे स्वतंत्र असण्याची शक्यताही नाकारता येणार नाही.

## समाप्तिसूचकांचा विचार

पंचदशीच्या निर्णयसागरमुद्रित प्रतीत, पहिल्या दहा प्रकरणांच्या अंती एकेक समाप्तिसूचक[१६] आहे. त्यांचे बाबतीत पुढीलप्रमाणे गोष्टी लक्षणीय आहेत:– (१) प्रकरणे १, ४ आणि ८ यांच्या समाप्तिसूचकांत पंचदशी ही भारतीतीर्थं व विद्यारण्य यांची आहे, असे म्हटले असून, एके ठिकाणी नुसते प्रकरणाचे नाव आहे, तर अन्य दोन ठिकाणी समाप्त असा शब्द वापरला[१७] आहे. (२) प्रकरणे २, ३, ५, ६, ७, ९, आणि दहा यांच्या समाप्तिसूचकात पंचदशी ही विद्यारण्यकृत म्हटले असून, बहुतेक ठिकाणी समाप्त शब्द उप-योजिला[१८] आहे. (३) ही समाप्तिसूचके एकाच नमुन्याची नसून, त्यांमध्ये भिन्नता आढळते. (४) काहींमध्ये प्रकरणांच्या शीर्षकनामांचाही उल्लेख आहे.

ही समाप्तिसूचके मूळ लेखकाची नव्हेत, हे पुढील गोष्टींवरून कळते:– (१) पंचदशीच्या निर्णयसागर मुद्रित प्रतीत त्याप्रमाणे इतर मुद्रित प्रतींत

अनुक्रमणिका

तशीच समाप्तिसूचके नाहीत. ( २ ) मागे दाखविले आहे की प्रकरणांची शीर्षके ही मूळ लेखकाची नसून, ती नंतर बनविण्यात आली आहेत. आता ही शीर्षके ज्या समाप्तिसूचकात येतात, ती समाप्तिसूचकेही नंतर बनविण्यात आली असली पाहिजेत हे उघड आहे. ( ३ ) पहिल्या प्रकरणाचा लेखक– मग तो परंपरेप्रमाणे भारतीतीर्थ असो अथवा विद्यारण्य असो– त्या प्रकरणाच्या समाप्तिसूचकात म्हटल्याप्रमाणे संपूर्ण पंचदशी ही भारतीतीर्थ आणि विद्यारण्य यांची आहे, असे म्हणणार नाही, हे स्पष्ट आहे.

ही समाप्तिसूचके रामकृष्ण टीकाकारानेही तयार केलेली नाहीत; कारण त्याच्या मते, फक्त ७ वे प्रकरण भारतीतीर्थाचे आहे. तसेच, अच्युतराय व निश्चलदास या टीकाकारांची मागे उल्लेखिलेली मते पाहिली तर त्यांनीही ही समाप्तिसूचके रचलेली असणार नाहीत, हे कळून येते. ( बहुधा मुद्रित पंचदशीच्या संपादकांनी ही समाप्तिसूचके रचली असावीत ).

तेव्हा, पंचदशीच्या पहिल्या दहा प्रकरणांची समाप्तिसूचके ही मूळ लेखकाची नसून, नंतर बनविण्यात आलेली असल्याने, त्यांच्या आधारे पंचदशीचे एकसंधत्व ठरू शकणार नाही.

## विषयाने एकसंधत्व ठरेल काय ?

आता कुणी म्हणेल की पंचदशीच्या १–१० प्रकरणांतील विषयावरून तिचे एकसंधत्व ठरू शकेल. उदा–पहिले प्रकरण हे सारभूताने अद्वैत तत्त्वज्ञान सांगते. आणि पहिल्या प्रकरणात येणाऱ्या पंचभूत ( १.३२ ) व पंचकोश ( १.३७ ) या शब्दांच्या आधारे त्यांचाच अधिक तपशील प्र. २–३ यांमध्ये आला. दुसऱ्या प्रकरणातील ' अद्वैत सत् ' ( २.१ ) शब्दाचा खुलासा करण्यास चौथे प्रकरण आहे. याच दुसऱ्या प्रकरणामध्ये जीवन्मुक्त शब्द येतो. (२.१०२); त्याच्या आधारे जीवन्मुक्ताची तृप्ति सांगणारे सातवे प्रकरण आहे. प्रकरण ६ व ७ यांमध्ये कूटस्थ शब्द अनेकवेळा येतो. त्याच्या स्पष्टीकरणास कूटस्थदीप हे आठवे प्रकरण आहे. [ सातव्या प्रकरणात ब्रह्मानंद शब्द आहे. ( ७.२९८ ). त्या शब्दाअंती संपूर्ण ब्रह्मानंद ग्रंथ ( प्र. ११–१५ ) आला आहे; ] इ. इ.

या संदर्भात पुढील गोष्ट प्रथमच लक्षात घ्यावी :– पंचदशी हा अद्वैत वेदांतावरचा ग्रंथ आहे; आणि अद्वैत वेदांतातील विषय हे एकमेकांशी निगडित आहेत, हे तज्ज्ञांना ज्ञात आहेच, आणि दुसरे असे की दूरान्वयाने कशाचाही कशाशीही संबंध जोडता येतो.

आता खरा प्रश्न असा आहे की, या दहा प्रकरणांतील विषय तर्कसंगतीने एकातून एक असे निघत जातात काय? वर उल्लेखिल्याप्रमाणे काही प्रकरणांचा इतर प्रकरणांशी संबंध दाखविता येईल. पण इतर प्रकरणांचे काय? उदाहरण देऊनच बोलायचे झाल्यासः– पाचवे प्रकरण उपनिषदांत येणाऱ्या महावाक्यांतील शब्दांचे अर्थविवेचन करण्यास आहे. तर ६–९ प्रकरणे संकीर्ण विषयांची चर्चा करतात. आणि दहावे प्रकरण हे साक्षि-चैतन्याचे स्वरूप दृष्टान्तद्वारा स्पष्ट करते. या प्रकरणांचा इतर प्रकरणांशी किती घनिष्ठ संबंध आहे? एकाच ग्रंथाचे अंगभूत घटक असे या प्रकरणांचे स्वरूप आहे की एखाद्या विशिष्ट विषयावरील स्फुट प्रकरणे असे त्यांचे स्वरूप आहे? यातील उत्तरोक्त विकल्पच अधिक पटण्यासारखा आहे. त्यामुळे विषयाचे दृष्टीनेही पंचदशीची एकसंधता अपरिहार्यपणे ठरत नाही. त्यामुळे ही दहा स्फुट वा प्रासंगिक प्रकरणे आहेत, या मताचा बाध होण्याचे कारण नाही.

अशाप्रकारे, पंचदशीच्या पहिल्या दहा प्रकरणांची शीर्षके, समाप्तिसूचके अथवा विषय यावरून ती प्रकरणे पंचदशीचे अंगभूत घटक आहेत, हे निश्चित होत नाही. याउलट काही परिस्थिति अशी आहे की जिच्यावरून ही दहा प्रकरणे पंचदशीचे घटक नसून, ती स्वतंत्र प्रकरणे होती व ती नंतर एकत्र केली गेली असे म्हणता येते. ही परिस्थिति म्हणजे रामकृष्ण टीकाकाराची प्रकरणारंभीची प्रास्ताविक वाक्ये आणि मंगले.

## रामकृष्ण टीकाकाराची प्रास्ताविक वाक्ये

प्रकरण १–१० मधील आपल्या मंगलानंतर, रामकृष्ण टीकाकार आपल्या टीकेच्या प्रास्ताविक भागात असे काही शब्द[११] वापरतो की त्यावरून त्याच्या दृष्टीने ते प्रकरण म्हणजे एक भिन्न ग्रंथ आहे, असे दिसते :– प्रारिप्सितग्रंथस्य ... मंगलाचरणं ... उपनिबध्नाति (प्र. १); चिकीर्षितग्रंथस्य ... मंगलं आचरन् ... ग्रंथारंभं प्रतिजानीते (प्र. ४); चिकीर्षितग्रंथस्य ... मंगलं आचरन् (प्र. ६); तृप्तिदीपाख्यं प्रकरणं आरभमाणः श्री भारतीतीर्थगुरुः ... श्रुतिं आदौ पठति (प्र. ७); कूटस्थदीपाख्यं ग्रंथं आरभमाणः आचार्यः (प्र. ८); चिकीर्षितग्रंथस्य ... मंगलं आचरन् (प्र. १०).

यांपैकी पहिल्या प्रकरणावरील वाक्याकडे दुर्लक्ष करण्यास हरकत नाही; कारण त्याचा संबंध पंचदशीच्या पहिल्याच प्रकरणाशी आहे. प्र. ७ हे तर भारतीतीर्थाचे आहे असे रामकृष्णाचे स्पष्ट मत आहे. इतर वाक्यांच्या संदर्भात पुढील गोष्टी लक्षात येतातः– (१) प्र. ४, ६, आणि १० ही रामकृष्णाला

अनुक्रमणिका

स्वतंत्र प्रकरणे वाटतात; म्हणून त्या प्रकरणांच्या पहिल्या श्लोकात मंगल आहे असे तो म्हणतो. ( २ ) प्रकरण ८ च्या बाबतीत रामकृष्ण मंगलाचा उल्लेख करीत नाही; 'कूटस्थदीप नावाचा ग्रंथ' या त्याच्या शब्दावरून, हे प्रकरणही त्याला स्वतंत्रच वाटते.

तेव्हा रामकृष्णाच्या वर निर्दिष्टलेल्या वाक्यांवरून असे कळते की त्याच्या मताने पंचदशीतील काही प्रकरणे तरी स्वतंत्र आहेत.

रामकृष्ण टीकाकाराचे मंगल श्लोक

आपल्या टीकेच्या आरंभी स्वतःचे मंगल रचण्याची बहुतेक संस्कृत टीकाकारांची पद्धत आहे. रामकृष्णानेही[१०] ही पद्धत अनुसरली आहे. प्रकरणे १–५ आणि प्र. ८–१० यांच्या आरंभी त्याचा प्रत्येकी एकेकच मंगल श्लोक आहे; व त्याचा पहिला चरण– 'नत्वा श्रीभारतीतीर्थविद्यारण्य– मुनीश्वरौ' – हा सर्वत्र समान आहे. फक्त ६ व ७ प्रकरणांचे बाबतीत त्याने पुढील गोष्ट केली आहे.– सहाव्या प्रकरणाच्या प्रारंभी, प्रथम विष्णूला वंदन करणारे दोन श्लोक असून, मग 'नत्वा ...... मुनीश्वरौ,' इ. श्लोक आहे; तर सातव्या प्रकरणाच्या सुरवातीला शिवाला वंदन करणारे दोन श्लोक असून, त्यानंतर 'नत्वा ...... मुनीश्वरौ' इ. श्लोक आहे.

'न त्वा ...... मुनीश्वरौ' या चरणाच्या पुढील दुसरा चरणात त्या त्या प्रकरणावरील टीकेसंबंधी त्याचे विधान आहे; पण हे विधान करताना त्याने पुढीलप्रमाणे भिन्न शब्दयोजना[११] केली आहे– पददीपिका (प्र. १ ), व्याख्यान (प्र. २), व्याख्या (प्र. ३), पदयोजना (प्र. ४), व्याख्या (प्र. ५), व्याख्या तात्पर्यबोधिनी ( प्र. ६ ); व्याख्यान ( प्र. ७ ); व्याख्या तात्पर्यदीपिका ( प्र. ८ ); व्याख्या ( प्र. ९ ); आणि, अर्थ ( प्र. १० ).

आता, ज्याअर्थी रामकृष्ण प्रत्येक प्रकरणाच्या प्रारंभी स्वतंत्र मंगल रचतो, व आपल्या टीकेसाठी व्याख्या, इ. इ. भिन्न शब्द वापरतो, आणि प्र. ६ आणि प्र. ८ यांवरील आपल्या टीकेला तो दोन वेगळी नावे देतो, त्याअर्थी त्याच्या दृष्टीने प्रकरणे १–१० मिळून एकच एकसंध ग्रंथ नसून, ती वेगळी स्वतंत्र प्रकरणे आहेत, हे स्पष्ट होते.

येथे कुणीतरी असे म्हणेल :– कालिदासरचित रघुवंशावर मल्लिनाथाने टीका रचली आहे. तेथेही त्याने प्रत्येक सर्गाच्या आरंभी स्वतःचे स्वतंत्र मंगल केले आहे; पण तेवढ्यावरून त्याला ते सर्ग स्वतंत्रपणे अभिप्रेत होते असे म्हणता येत नाही. तीच भूमिका रामकृष्णाच्या बाबतीतही घ्यावयास हवी.

या म्हणण्याचे निराकरण पुढीलप्रमाणे करता येते :– रघुवंश या एकाच ग्रंथाच्या भिन्न सर्गांसाठी स्वतंत्र मंगले मल्लिनाथाने रचली असतील; पण महत्त्वाची गोष्ट अशी की तेथे त्याने आपल्या टीकेसाठी दरखेपेला स्वतंत्र नावे वा शब्द वापरलेले नाहीत. पहिल्या सर्गाच्या सुरवातीस, एका मंगलश्लोकात त्याने आपल्या टीकेचे 'संजीवनी' हे नाव दिले आहे; पण पुढे सर्गारंभीच्या मंगलश्लोकांत तो या टीकेबद्दल वेगवेगळे शब्दही वापरीत नाही किंवा आपल्या टीकेचा वेगळा निर्देशही करीत नाही, हे लक्षात ठेवले पाहिजे. असा प्रकार मात्र रामकृष्णाने केलेला नाही. तर आपली टीका सूचित करण्यास तो प्रत्येक-वेळी नवीन शब्द वापरतो; इतकेच नव्हे तर दोनदां त्याने आपल्या टीकांना दोन स्वतंत्र नावेही दिलेली आहेत. त्यामुळे रामकृष्णाला ही १० प्रकरणे स्वतंत्रच वाटत होती, यात शंका वाटत नाही. त्यामुळे १–१० प्रकरणे मिळून एकच ग्रंथ नसून, ती स्वतंत्र व वेगळी प्रकरणे आहेत, ही रामकृष्णाची भूमिका स्पष्ट होते. तशी त्याची भूमिका नसती, तर प्र. ११–१५ या एकाच ब्रह्मानंद नावाच्या ग्रंथाच्या बाबतीत जसे त्याने एकच मंगल फक्त पहिल्या प्र. ११ च्या प्रारंभी दिले, तसे त्याने एकच मंगल पहिल्या दहा प्रकरणांसाठी म्हणून पहिल्या प्रकरणाच्या सुरवातीलाच तेवढे दिले असते आणि उरलेल्या २–१० प्रकरणां-साठी पुन: स्वतंत्र मंगल रचले नसते. पण ज्याअर्थी त्याने प्र. १–१०पैकी प्रत्येक प्रकरणासाठी स्वतंत्र मंगल रचले आहे व त्यात आपल्या टीकेचा भिन्न भिन्न उल्लेख केला आहे, त्याअर्थी त्याच्या मते पहिली १–१० प्रकरणे मिळून एकच ग्रंथ नसून, ती वेगवेगळी फुटकळ प्रकरणे आहेत, हे लक्षात येते.

अशाप्रकारे पंचदशीतील पहिल्या दहा प्रकरणांची शीर्षके, समाप्तिसूचके आणि विषय यावरून ही प्रकरणे एकाच ग्रंथाचे घटक आहेत, हे निर्विवादपणे सिद्ध होत नाही. या उलट, रामकृष्ण टीकाकाराची प्रास्ताविक वाक्ये व मंगले यावरून ही प्रकरणे एकाच ग्रंथाचे घटक भाग नसून, स्वतंत्र प्रकरणे आहेत, हे कळून येते. आणि पंचदशीच्या भिन्नकर्तृत्वाविषयी जी परंपरा आहे, ती या म्हणण्याला पुष्टिदायक ठरते.

## एका शंकेचे निराकरण

येथे कुणीतरी असे म्हणेल:– प्रकरणांची शीर्षके, समाप्तिसूचके, तसेच टीकाकाराची वाक्ये, मंगले, त्याचप्रमाणे पंचदशीच्या भिन्न कर्तृत्वाविषयीची परंपरा, हा सर्वच बाह्य पुरावा आहे. त्याच्या आधारे पंचदशीच्या एकसंधते-विषयी वा घटनेविषयी निर्णय करणे बरोबर होणार नाही.

अनुक्रमणिका

हे म्हणणे मान्य होण्यासारखेच आहे. फक्त येथे एक गोष्ट लगेच सांगितली पाहिजे ती अशी:– पंचदशीच्या अंतर्गत पुराव्यावरूनही पंचदशीच्या त्रुटित घटनेविषयी निर्णय घेता येतो असे मागे सूचित केले, तेच येथे सविस्तरपणे पाहिले की वरील म्हणण्याला आपोआपच उत्तर मिळते.

## पंचदशीतील अंतर्गत पुरावा

पंचदशी ही एकसंध नाही, हे दाखविण्यास पुढील अंतर्गत पुरावा देता येतो:– ( १ ) सध्याच्या उपलब्ध पंचदशीची ११–१५ प्रकरणे म्हणजे ब्रह्मानंद नामक स्वतंत्र आणि स्वयंपूर्ण ग्रंथ आहे, हे मागे त्या प्रकरणांतील अंतर्गत पुराव्यावरून सिद्ध केले आहे. ( त्यावेळी केवळ आनुषंगिक म्हणून रामकृष्ण टीकाकाराचा पुरावा दिलेला होता ).

( २ ) पंचदशीच्या पहिल्या प्रकरणाच्या मंगलाचा विचार केला तर ते फक्त पहिल्या प्रकरणापुरतेच आहे असे दिसते. हे मंगल असे: –

नमः श्रीशंकरानंदगुरुपादाम्बुजन्मने ।
सविलासमहामोहग्राहग्रासैककर्मणे ॥
तत्पादाम्बुरुहद्वंद्वसेवानिर्मलचेतसाम् ।
सुखबोधाय तत्त्वस्य विवेकोऽयं विधीयते ॥ ( १. १–२ )

हे मंगल उरलेल्या नऊ प्रकरणासाठी असण्याचा त्याचा सूरही नाही. तसेच पहिल्या प्रकरणाच्या अंती फलश्रुति आहे. या सर्वांचा अर्थ असा की हे पहिले प्रकरण स्वतंत्र आणि स्वयंपूर्ण आहे.

( ३ ) श्रुतीने सदद्वैत[२२] सांगितले आहे. त्याचा बोध करून देण्यास भूतपंचकाचे[२३] विवेचन दुसऱ्या प्रकरणात केलेले आहे. म्हणजे श्रुतीच्या एका वचनाचा खुलासा करण्यास हे प्रकरण आहे; ते पंचदशीचा अंगभूत घटक मानण्याचे कारण नाही. तसेच या प्रकरणाच्या अंतीची फलश्रुतिही या दुसऱ्या प्रकरणाचे स्वयंपूर्णत्व दाखविते.

( ४ ) प्रकरण दोन प्रमाणेच प्रकार पाचव्या प्रकरणाच्या बाबतीत वेगळ्या स्वरूपात आहे. हे पाचवे प्रकरण तर उघड उघड पंचदशीचा भाग नसून, उपनिषदांनी सांगितलेल्या महावाक्यातील शब्दांचा अर्थ स्पष्ट करण्यास हे प्रकरण आहे. त्यामुळे हे पाचवे प्रकरण स्पष्टपणे स्वतंत्र प्रकरण आहे, यात शंका वाटण्याचे कारणच नाही.

(५) प्रकरण २ आणि ५ याप्रमाणेच थोडाफार प्रकार प्र. ७ च्या बाबतीत आहे. म्हणजे असे :– सातव्या प्रकरणाच्या प्रारंभी एक श्रुतीतील वाक्य उद्धृत

केले आहे; आणि या श्रुतिवचनाचा अभिप्राय या प्रकरणात सांगितला जाईल की ज्यामुळे जीवन्मुक्ताची तृप्ति स्पष्ट होईल, असे या प्रकरणाच्या[२४] प्रारंभीच सांगितले आहे. म्हणजे हे सातवे प्रकरणही पंचदशीचा अंगभूत घटक नसून, एका श्रुतिवचनाचा अभिप्राय स्पष्ट करणारे प्रासंगिक प्रकरण आहे. तसेच या प्रकरणातील शेवटची फलश्रुति या प्रकरणाचे स्वयंपूर्णत्व दाखविण्यास उपयोगी आहे.

( ६ ) दहाव्या प्रकरणाच्या पहिल्या श्लोकावरून हे स्पष्ट होते की येथे एका नवीनच विषयाच्या चर्चेचा प्रारंभ केला जात आहे. ( संवादिभ्रमवद् ब्रह्मतत्त्वोपास्त्यापि मुच्यते। उत्तरे तापनीयेऽतः श्रुतोपास्तिरनेकधा ॥ १०.१ ) म्हणजे याही प्रकरणाचा मागील प्रकरणांशी घनिष्ठ असा संबंध नाही.

( ७ ) पंचदशीच्या पहिल्या १–१० प्रकरणांपैकी पाचवे व दहावे प्रकरण सोडल्यास, इतर प्रकरणांच्या अंती फलश्रुति आढळते. ही गोष्ट अतिशय महत्वाची आहे. या सर्वच प्रकरणांच्या अंती फलश्रुति असती तर तिला फारसे महत्त्व देण्याचे कारण पडले नसते. पण जेव्हा दोन प्रकरणांत फलश्रुति आढळत नाही, तेव्हा विचार करण्याची पाळी येते. प्रकरणे १–१० हा तर एकसंध ग्रंथ असता, तर एकतर सर्वच प्रकरणांच्या अंती फलश्रुति येण्यास हरकत नव्हती किंवा फक्त शेवटच्या दहाव्या प्रकरणाच्या अंती फलश्रुति आली असती तरी बिघडले नसते. पण प्रस्तुत ठिकाणी मात्र वेगळाच प्रकार घडला आहे. मधल्याच पाचव्या प्रकरणात फलश्रुति नाही; आणि सर्वात अतिशय महत्वाची गोष्ट म्हणजे, जेथे फलश्रुति खरे म्हणजे अपेक्षित होती, त्या शेवटच्या दहाव्या प्रकरणाच्या अन्ती मात्र फलश्रुतीच नाही. तेव्हा येथेही अंती फलश्रुति असणारी प्रकरणे एका ग्रंथाचे घटक नसून, स्वतंत्र प्रकरणे आहेत, हे म्हणण्यास प्रत्यवाय नाही.

येथे कुणीतरी म्हणेल :– पंचदशी हे ग्रंथाचे शीर्षक १५ प्रकरणे बोधित करते. तेव्हा दहाव्या प्रकरणाच्या अंती फलश्रुति नाही, याला फारसे महत्त्व नाही. तर शेवटच्या पंधराव्या प्रकरणात फलश्रुति असली तर चालेलच !

पण हे म्हणणे मान्य करता येत नाही. याची कारणे अशी :– ( १ ) पंचदशीची ११–१५ प्रकरणे ही पंचदशीची घटक नसून, ती ब्रह्मानंद नावाच्या स्वतंत्र ग्रंथाचे पाच अध्याय आहेत, हे मागेच सिद्ध करून दाखविले आहे. ( २ ) सर्वात महत्वाची गोष्ट अशी की वरील शंकाकाराला अभिप्रेत असल्याप्रमाणे, पंधराव्या प्रकरणाच्या अन्ती किंवा उपान्ती कोणत्याही प्रकारची फलश्रुति येतच

अनुक्रमणिका

नाही. ( ३ ) पंधराव्या प्रकरणाच्या अंतिम श्लोकात केवळ ब्रह्मानंद या ग्रंथाचा समारोप आहे.

## अंतिम निर्णय

तेव्हा वर चर्चिलेल्या सर्वच गोष्टींचा जर साकल्याने विचार केला तर पुढील निर्णयच घ्यावा लागतो:— मुळात पंचदशी हा एकसंध ग्रंथ नव्हताच. त्यातील पहिली दहा प्रकरणे म्हणजे फुटकळ किंवा प्रासंगिक स्वरूपाची स्वतंत्र प्रकरणे होती. ती प्रथम कुणीतरी एकत्र केली. त्यानंतर पाच अध्यायांनी युक्त असणारा ब्रह्मानंद नावाचा स्वतंत्र ग्रंथ पुढची ११–१५ प्रकरणे म्हणून पहिल्या दहा प्रकरणांना जोडण्यात आला. आता एकूण पंधरा ( = पंचदश ) प्रकरणे[२५] झाली. मग त्या एकत्रित झालेल्या ग्रंथाला पंचदशी असे संख्यात्मक[२६] नाव देण्यात आले. यामुळेच पंचदशी हे नाव या पंधरा प्रकरणात कुठेही सापडतच नाही. अशा प्रकारे, उपलब्ध पंचदशी हा एकसंध ग्रंथ नसून, दहा फुटकळ प्रकरणे व पंचअध्यायात्मक एक स्वतंत्र ग्रंथ एकत्र येऊन, तो बनला आहे.

## संदर्भ टीपा —

१. विद्यारण्याबद्दल पारंपरिक माहिती उपलब्ध आहे; पण ती कितपत विश्वसनीय आहे हा प्रश्नच आहे. सायणाचा भाऊ माधव म्हणजे विद्यारण्य असे काहीजण मानतात; तथापि ते इतरांना मान्य नाही. कुणी म्हणतात व्यासांनी विद्यारण्य हे नाव त्यांना दिले, तर काहींच्या मते ते त्यांचे संन्यासाश्रमातले नाव होते. भारतीतीर्थ हे कधी विद्यारण्यांचे गुरु मानले जातात; पण ते शंकास्पद दिसते. विद्यातीर्थ व शंकरानंद यांचा गुरु म्हणून निर्देश विद्यारण्यांनी केला आहे. विजयनगर राज्याच्या इतिहासात विद्यारण्यांना महत्त्वाचे स्थान दिले जाते. काही काळ ते शृंगेरी मठाचे अधिपति होते. इ. स. १२६८ ते इ. स. १३८६ यामध्ये केव्हातरी त्यांची जीवनयात्रा झाली. त्यांचे नावावर अनेक विषयावरील ग्रंथ आहेत; पण त्यांचे असे ग्रंथ किती हा प्रश्न वादग्रस्तच आहे.

२. पंचदशीच्या निर्णयसागर प्रतीतील (मुंबई, १९४९) प्रकरणान्तीच्या काही समाप्तिसूचकात पंचदशी भारतीतीर्थ व विद्यारण्य यांनी रचली, तर काहीमध्ये विद्यारण्याने रचली, असे म्हटले आहे. या समाप्तिसूचकांचा विचार पुढे केलेला आहे.

अनुक्रमणिका

३. येथे रामकृष्णाची ११–१५ प्रकरणांवरील प्रास्ताविक वाक्ये लक्षात घेतलेली नाहीत. कारण ही प्रकरणे म्हणजे ब्रह्मानंद नावाच्या स्वतंत्र ग्रंथाचे पाच अध्याय आहेत, हे रामकृष्णाला मान्य आहे. याचा अधिक विचार पुढे केला आहे. आणि या प्रकरणारंभी रामकृष्ण ग्रंथकर्त्याचे नाव देतच नाही.

४. ब्रह्म च असौ आनंदः च इति ब्रह्मानंदः, वाच्यवाचकयोरभेदोपचारात् तत्प्रतिपादको ग्रंथोऽपि ब्रह्मानंदः । रामकृष्ण.

५. प्रीयाद्धरिर्हरोऽनेन ब्रह्मानन्देन सर्वदा ।
पायाच्च प्राणिनः सर्वान् स्वाश्रितान् शुद्धमानसान् ॥ १५·३५

६. नत्वा श्रीभारतीतीर्थ-विद्यारण्य-मुनीश्वरौ ।
ब्रह्मानंदाभिधं ग्रंथं व्याकुर्वे बोधसिद्धये ॥

७. ही गोष्ट फारच महत्त्वाची आहे. कारण रामकृष्णाने पंचदशीच्या पहिल्या दहा प्रकरणांपैकी प्रत्येकाला आपला स्वतःचा मंगल श्लोक जोडला आहे. याचे महत्त्व पुढे स्पष्ट केले आहे.

८. ननु आनन्दस्त्रिविधो ब्रह्मानंदो विद्यासुखं तथा विषयानंद इति प्रथमाध्याये आनंदत्रयमेव प्रतिज्ञाय, द्वितीयाध्याये तदतिरिक्तात्मानंदनिरूपणात् तद्विरोधो जायते, इत्याशंक्य आह– योगानंदः पुरोक्तो यः स आत्मानंद इष्यताम् । ( १३.१ ).

९. सदद्वैतं श्रुतं यत्तत् पंचभूतविवेकतः ।
बोद्धुं शक्यं, ततो भूतपंचकं प्रविविच्यते ॥ २.१

१०. गुहाहितं ब्रह्म यत्तत् पंचकोशविवेकतः ।
बोद्धुं शक्यं, ततः कोशपंचकं प्रविविच्यते ॥ ३.१

११. ईश्वरेणापि जीवेन सृष्टं द्वैतं विविच्यते ।
विवेके सति जीवेन हेयो बंधः स्फुटीभवेत् ॥ ४.१

१२. इत्थं तत्त्वविवेकं विधाय ... प्राप्नोति परं पदं नरो न चिरात् ( १.६५ ); अन्तकालेऽप्यतो भूतविवेकान्निर्वृतिः स्थिता ( २.१०९ ); य एवं ब्रह्म वेदैष ब्रह्मैव भवति स्वयम् । ब्रह्मणो नास्ति जन्मातः पुनरेष न जायते ॥ ( ३.४३ ); जीवन्मुक्तेः पराकाष्ठा जीवद्वैतविवर्जनम् । लभ्यतेऽसावतोऽत्रेदमीश-द्वैताद् विवेचितम् ( ४.६९ ).

१३. चित्रदीपमिमं नित्यं येऽनुसंदधते बुधाः । पश्यन्तोऽपि जगच्चित्रं ते मुह्यन्ति न पूर्ववत् ॥ ( ६.२९० ); तृप्तिदीपमिमं नित्यं येऽनुसंदधते बुधाः । ब्रह्मानन्दे निमज्जन्तस्ते तृप्यन्ति निरन्तरम् ॥ ( ७.२९८ ); इमं कूटस्थदीपं

अनुक्रमणिका

योऽनुसंधत्ते निरन्तरम् । स्वयं कूटस्थरूपेण दीप्यतेऽसौ निरन्तरम् ॥ ( ८.७६ ); ध्यानदीपमिमं सम्यक् परामृशति यो नरः। मुक्तसंशय एवायं ध्यायति ब्रह्म संततम् ॥ ( ९.१५८ ).

१४. येथे ११–१५ प्रकरणांच्या शीर्षकांचा विचार करणे आवश्यकच नाही.

१५. दहाव्या प्रकरणात, नृत्यशाला (१०.१०–११), नृत्यति (१०.१३), नर्त्यमाने नृत्यति (१०.१८) नर्तकी (१०.१४), सभ्य (प्रेक्षक) (१०.११) असले शब्द येतात.

१६. येथेही ११–१५ प्रकरणांच्या समाप्तिसूचकांचा विचार आवश्यक नाही.

१७. इति श्रीमत्परमहंस–परिव्राजकाचार्य-श्रीभारतीतीर्थ–विद्यारण्यमुनि-कृत–पंचदश्यां तत्वविवेकाख्यं प्रथमं प्रकरणम् ( प्र. १ ); इति श्रीमत्परमहंस –परिव्राजकाचार्य–श्रीभारतीतीर्थ– विद्यारण्यमुनिवर्य–कृत-पंचदश्यां द्वैतविवेकः समाप्तः ( प्र. ४ ); इति श्रीमत्–परमहंस– परिव्राजकाचार्य–श्रीभारतीतीर्थ –विद्यारण्यस्वामि- विरचित–पंचदश्यां कूटस्थदीपः समाप्तः ( प्र. ८ ).

१८. इति श्रीविद्यारण्यमुनि–विरचितायां पंचदश्यां भूतविवेकः समाप्तः ( प्र. २ ) ; इति विद्यारण्यमुनि- विरचितायां पंचदश्यां पंचकोशविवेकः ( प्र. ३ ); इति श्रीमत्–परमहंस–परिव्राजकाचार्य–विद्यारण्यमुनिवर्य–कृत–पंचदश्यां महा-वाक्यविवेकः समाप्तः ( प्र. ५ ); इति विद्यारण्यविरचितायां श्रीपंचदश्यां चित्रदीपः समाप्तः ( प्र. ६ ) ; इति श्रीविद्यारण्य–कृत–पंचदश्यां तृप्तिदीपाख्यं प्रकरणं समाप्तम् ( प्र. ७ ); इति श्रीमत्–परमहंस–परिव्राजकाचार्य–विद्या-रण्य– प्रणीत–पंचदश्या ध्यानदीपाख्यं नवमं प्रकरणं समाप्तम् ( प्र.९ ); इति श्रीमत्–परमहंस–परिव्राजकाचार्य–विद्यारण्य–कृत–पंचदश्या नाटकदीपप्रकरणं दशमं सा माप्तम् (प्र. १० ).

१९. रामकृष्णाच्या प्र. ११–१५ च्या प्रारंभीच्या प्रास्ताविक शब्दांचा विचार या अगोदरच येऊन गेला आहे.

२०. प्रकरणे ११–१५ साठीच्या असणाऱ्या प्रारंभीच्या त्याच्या मंगल-श्लोकाची चर्चा यापूर्वीच झाली आहे.

२१. प्रत्यक्तत्वविवेकस्य क्रियते पददीपिका (प्र. १); पंचभूतविवेकस्य व्याख्यानं क्रियते मया (प्र. २); पंचकोशविवेकस्य कुर्वे व्याख्यां समासतः (प्र. ३);

अनुक्रमणिका

मया द्वैतविवेकस्य क्रियते पदयोजना (प्र. ४); महावाक्य विवेकस्य कुर्वे व्याख्यां समासतः (५); क्रियते चित्रदीपस्य व्याख्या तात्पर्य– बोधिनी (प्र. ६); क्रियते तृप्तिदीपस्य व्याख्यानं गुर्वनुग्रहात् (प्र. ७); कुर्वे कूटस्थदीपस्य व्याख्यां तात्पर्यदीपिकाम् (प्र. ८); क्रियते ध्यानदीपस्य व्याख्या संक्षेपतो मया (प्र. ९); अथो नाटकदीपस्य मया संक्षिप्य वक्ष्यते (प्र. १०).

२२. सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् । छांदोग्य श्रुति, ६·२·१

२३. सदद्वैतं श्रुतं यत्तत् पंचभूतविवेकतः ।
बोद्धुं शक्यं, ततो भूतपंचकं प्रविविच्यते ।। २·१

२४. आत्मानं चेद्विजानीयात् अयमस्मीति पूरुषः ।
किमिच्छन् कस्य कामाय शरीरमनुसंज्वरेत् ।।
अस्याः श्रुतेरभिप्रायः सम्यगत्र विचार्यते ।
जीवनमुक्तस्य या तृप्तिः सा तेन विशदायते ।। ७. १–२

येथील 'आत्मानं चेद् ... संज्वरेत्' श्रुतीचे वचन म्हणजे बृहदारण्यक उपनिषद् ४. ४. १२ आहे.

२५. परंपरेप्रमाणे पंचदशी ही विद्यारण्याची वा विद्यारण्य व भारतीतीर्थ यांची. येथे फुटकळ प्रकरणे असल्याने, एकदोन ( उदा.– प्र. ५ व १० ) ही अन्य लेखकाची असण्याचीही शक्यता आहे. पहिल्या प्रकरणाच्या प्रारंभी 'शंकरानंदगुरु' असा निर्देश आहे. परंपरेप्रमाणे शंकरानंद हा विद्यारण्याचा गुरु होता. तेव्हा पहिले प्रकरण विद्यारण्याचे मानण्यात अडचण येऊ नये.

२६. संस्कृतमध्ये संख्यात्मक शीर्षक असणारे कितीतरी ग्रंथ आहेत. उदा. पंचतंत्र, सूमीष्टक, अन्ययोगव्यवच्छेदद्वात्रिंशिका, सांख्यसप्तति, अमरुशतक, इ. इ. ग्रंथाच्या शीर्षकात संख्यावाचक शब्दाच्या पुढे–मागे अन्य काहीतरी शब्द हवा आणि तसा तो पंचदशी या शीर्षकात नाही असे पाहून कुणीतरी 'वेदान्तपंचदशी' हे शीर्षक बनविलेले दिसते. आणि पंचदशी या शीर्षका-प्रमाणेच हे शीर्षकही पंधरा प्रकरणात कुठेच येत नाही.

◆ ◆ ◆

अनुक्रमणिका

श्री. आनंद ना. कुंभार

# यादव महामंडलेश्वर सिंधणदेव (तिसरा) याचा कामती (खुर्द) येथील शके १२३८ चा शिलालेख

---

## उपलब्धि

सोलापूरच्या पश्चिमेस सोलापूर–बेगमपूर रस्त्यावर सुमारे १०–१२ मैलांवर कामती खुर्द नावाचे एक लहानसे खेडे आहे. गावातील प्राथमिक शाळेसमोर एक पार आहे. त्या पाराच्या कोपऱ्यावर जमिनीत उभा गाडलेल्या स्थितीत सदरील शिलालेख उपलब्ध झाला आहे. या शिलालेखाबद्दल मी प्रथम 'नवभारत' (सप्टे. १९७३) मधून एक छोटेसेच टिपण लिहिले होते. त्यात केवळ लेखाचा बाह्यांग परिचय करून दिला होता. त्यावेळी नुकताच मी कोरीव लेखांकडे आकर्षिलो गेलो होतो. प्राचीन लिपीचा माझा अभ्यास असा नव्हता म्हणून त्या लेखाच्या शेवटी लेख कोणी संपादित करण्यास पुढे आल्यास शक्य ती सर्व मदत करू असे मी म्हटले होते. अद्यापि कोणाकडून प्रतिसाद मिळाला नाही. दरम्यान मी स्वतः थोडा बहुत प्राचीन कोरीव लेखातील लिपीचा अभ्यास केला व २–४ लेख वाचून प्रसिद्ध केले. आता हा कामतीचा लेख पाठासहित प्रथमच येथे प्रसिद्ध होत आहे. तो अनेक दृष्टींनी महत्त्वाचा आहे.

या लेखाव्यतिरिक्त कामती येथे आणखी तीन लेख उपलब्ध झाले आहेत. ते सर्व कन्नड लिपीतील आहेत. त्यापैकी दोन लेख संशोधकांच्या वाचनशक्तीबाहेर आहेत व एक उत्तम स्थितीत आहे. परंतु त्याचा खालील भाग फुटून गहाळ झाला आहे. हा लेख कलचुरिबिज्जलदेवाचा जमीनदान विषयक आहे.[१]

## वर्णन

हा लेख चौकोनी स्तंभाकृति शिलेवर आहे. लेख असलेली शिलेची बाजू साधारण घोटीव आहे. शिलेचा काही भाग जमिनीत गाडला गेला आहे.

अनुक्रमणिका

त्यामुळे त्याची नेमकी लांबी देता येणार नाही. परंतु एकंदर ती ४–६ फूट लांबीची असावी. त्याची रुंदी ११·४ इंच व जाडी १ फूट १·८ इंच आहे. प्रत्यक्ष लेखाची लांबी रुंदी २ फूट ६ इंच × १०·५ इंच आहे. लेखाच्या एकूण ४३ ओळी आहेत. ओळ क्र. ३६ आणि ३७ ह्यामध्ये उजवीकडे अगदी बारीक अक्षरात काही मजकूर कोरला आहे. ओळ क्र. १६–२०, २३–२८, ३०–३३, ३८–४२ याचा अगदी उजवीकडील काही भाग फुटून अक्षरे नष्ट झाली आहेत. लेखाची अक्षरे सुमारे $\frac{1}{2}$ इंच लांबी रुंदीची आहेत; आणि शेवटपर्यंत त्याचा तोच आकार कायम आहे. लेख अत्यंत खराब झालेला आहे. बहुतेक सर्व ठिकाणी अक्षरांचे टवके उडाल्यामुळे मजकूर लावणे अत्यंत जिकिरीचे होऊन बसले आहे. वरील बाजूस चंद्रसूर्य आणि तलवारीची चित्रे कोरली आहेत.

अक्षरवाटिका–लेखनपद्धति–भाषा

लेख अथपासून इति पर्यंत नागरी लिपीत आहे. १२-१३ व्या शतकाच्या इतर लेखांमधून जी अक्षरांची वळणे असतात त्याहून वेगळे असे काही नाही. पृष्ठमात्रेचा उपयोग नाही. प्रत्येक ओळीच्या सुरवातीस व शेवटास दोन दोन उभे दंड कोरलेले आहेत. लेखाची भाषा संस्कृत आहे. लेख पद्यात आहे.

कालनिश्चिति

लेखातील कालोल्लेख लेखाच्या ३६ व्या ओळीच्या शेवटी व ३७ व्या ओळीच्या सुरवातीस आला आहे. तो असा आहे–' सके १२३ (८) नल संवछर आषाड वदि×× अमावस्या ' शकांकाचा शेवटचा आकडा फुटून नष्ट झाला आहे. परंतु संवत्सरावरून तो निश्चित करता येतो. प्रा. ग. ह. खरे यांच्या 'संशोधकाचा मित्र' पुस्तकात दिलेल्या कालगणनेनुसार नल संवत्सर हा शके १२३८ साली येतो.[२] त्याचा इसवी सन १३१६ असा येतो. हा काळ यादव राजा सिंघण (तिसरा) याच्या कारकीर्दीत मोडतो. म्हणजे यातील राजा व काल यात काही एक गल्लत नाही.

व्यक्तिनामें – स्थलनामें.

लेखामध्ये खालील प्रमाणे व्यक्तिनामें. आली आहेत.

(१) सिंघनदेव (ओळ क्र. २८)
(२) बलराघवदेव (ओळ क्र. ३१)
(३) सिद्धनाथ (ओळ क्र. ३६)

यातील पहिली व्यक्ति म्हणजे यादव सम्राट रामचंद्रदेव याचा पुत्र सिंघणदेव होय. हा अद्यापि शंकरदेव या नावाने ओळखला जातो.[३] याच्या नावाचा उल्लेख यादवांच्या साऱ्या बिरुदावलीसह आलेला आहे. यादवांचे राज्य अलाउद्दिन खिलजीने जिंकल्यानंतर त्यांचे राज्य जवळ जवळ एका मंडलिकाचे राज्य झाल्यासारखे होते म्हणजे एका अर्थाने यादव हे दिल्लीच्या सुलतानाचे मंडलिक झाले होते. परंतु यादवांच्या कोणत्याही कोरीव लेखांत त्यांचा महामंडलेश्वर म्हणून उल्लेख आतापर्यंत आलेला नव्हता. या लेखामध्ये त्यांच्या पारंपरिक बिरुदावलीसह पण अगदी सुरवातीसच 'महामंडलेश्वर परमेश्वर' असा उल्लेख आला आहे. राजा रामचंद्रदेव सत्तेवर असताना दिल्लीपतीस ठरल्याप्रमाणे वेळेवर खंडणी जात होती म्हणून बादशहाने त्यांचे-म्हणजे यादवांचे--सर्व हक्क त्यांच्या राज्यापुरते पूर्वीप्रमाणे कायम ठेवले होते. रामचंद्रानंतर त्याचा मुलगा सिंघण गादीवर आला. तो मात्र वेळेवर खंडणी न पाठविणे किंवा मुळात पाठवावयाचीच नाही असे केल्यामुळे दिल्लीच्या सुलतानास देवगिरीकडे पुन्हा पहावे लागले. त्यावेळी यादवांच्या सत्तेमध्ये बरीच कपात करून त्यांना मंडलिक बनविले असावे. या शिलालेखामध्ये यादव सिंघण ( तिसरा ) हा कोणाचा मंडलिक होता हे जरी स्पष्ट केले नसले तरी तो व त्याचे राज्य दिल्लीच्या आधीन गेले होते हे उघड आहे.

राजा रामचंद्रदेव याचा हा मुलगा शंकरदेव या नांवाने जरी ओळखला जात असला तरी त्याचे नाव सिंघण असेच होते. हे प्रा. म. शं. वाबगावकर यांनी त्यांच्या एका लेखाद्वारे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे.[४] कामतीच्या या लेखापासून आता स्पष्ट होते की, त्याचे नांव शंकरदेव नसून सिंघण असेच होते.

यादवांचे आतापर्यंत सुमारे ५०० कोरीव लेख उजेडात आले आहेत. त्यात सिंघण तिसऱ्याचा एकही लेख नाही. हा त्याचा उल्लेख-किंबहुना त्याच्याच कारकीर्दीतला एकमेव शिलालेख होय. उजेडात आलेल्या यादव शिला-ताम्रलेखांत सर्वात अलीकडचा म्हणून ओळखला जातो तो पुरुषोत्तम-पुरी ताम्रपट.[५] प्रस्तुत लेख मिळाल्यामुळे हा यादवांच्या उपलब्ध शिलालेखामध्ये सर्वात अलीकडचा ठरतो. ह्या नंतरच्या काळातला एकही लेख अद्याप मिळाला नाही. म्हणजे हा लेख यादवांचा जवळ जवळ शेवटचा कोरीव लेख म्हणावयास हरकत नसावी.

दुसऱ्या व्यक्तीचे नाव मंडलिकमंडिताधिराज बलराघवदेव असे आहे. याच्या नावामागेही अनेक बिरुदावली लावण्यात आल्या आहेत. तो त्यावेळी

सोनलीपुरास रहात असे. यादवराज रामचंद्रदेव यांच्या काही मुख्य अधिकाऱ्यांची नावे डॉ. ओ. पी. वर्मा आपल्या ग्रंथात देतात.[६] राघव नावाच्या एका अधिकाऱ्याचे नाव त्यात आलेले आहे. प्रस्तुत लेखातला बलराघवदेव आणि हा राघव ह्या एकच व्यक्ती तर नसतील ना ?

तिसऱ्या व्यक्तीचे नाव सिदनाथ असे आहे. मध्ययुगातील वीरशैवमतोद्धारक बसव अल्लमादि शिवशरणाचे समकालीन सोलापुरचे महान वीरशैव संतकवि व योगी सिद्धरामेश्वर यांच्या अनेक नावापैकी तो एक आहे. सिद्धरामेश्वर ( ११३५–११८० ) ही एक ऐतिहासिक व्यक्ती होऊन गेली आहे.

कर्नाटक आणि महाराष्ट्रांत मिळून आतापर्यंत सुमारे २५ शिलालेख त्यांशी संबंधित मिळालेले आहेत[७]. कोणत्याही संताचे एवढे शिलालेख अद्यापि उपलब्ध झालेले नाहीत. माझ्या कोरीव लेखाच्या संशोधनात नव्याने आणखीन काही लेख त्याशी संबंधित मिळाले आहेत ते सर्व यथावकाश प्रसिद्ध होतील. प्रस्तुत लेखाची सुरवात सिद्धरामेश्वराच्या एका संस्कृत वचनाने झाली आहे. हा लेख अत्यंत खराब झाला आहे हे मी आधीच सांगितले आहे. दुसरा एक अशाच प्रकारच्या ( मजकुराचा ) सुस्थितीतील लेख मिळाल्याशिवाय त्याचे वाचन म्हणजे अत्यंत दुर्घट काम होय. काही दिवसांपूर्वी सिद्धरामेश्वराशी संबंधित अनेक शिलालेख नजरेखालून घालताना त्यापैकी एक ह्या कामती लेखाशी मिळता–जुळत्या मजकुराचा आढळला.[८] हा लेख टाकळी ( ता. इंडी. जि. विजापूर ) येथे मिळाला आहे. हा सुद्धा संस्कृत भाषेत व नागरी लिपीत आहे. ह्या लेखात आलेले सिद्धरामेश्वराचे संस्कृत वचन आणि कामती लेखातील वचन एकच आहे असे कळून आले. म्हणून ह्या ठिकाणी जो कामती लेखाचा सुरवातीचा पाठ दिला आहे तो टाकळी लेखावरूनच देऊ शकलो. अन्यथा शक्य नव्हते इतक्या दयनीय अवस्थेत सध्या तो आहे. वचनानंतर आलेला भाग मात्र थोडया चांगल्या अवस्थेत आहे. परंतु तो भागसुद्धा महत्प्रयासाने वाचणे शक्य आहे. सिद्धरामेश्वर श्री पर्वतावरील मल्लिकार्जुनदेवाचे परमभक्त होते. त्यांचे एक भव्य मंदीर त्यानी सोलापुरास स्थानिक राजाच्या मदतीने बांधून काढले. सध्या ते भग्नावस्थेत सोलापूरच्या किल्ल्यात आहे. त्या मंदीराच्या दानासंबंधीतच हा लेख कोरला गेला आहे. सिद्धरामेश्वर ज्याप्रमाणे संत–शिवशरण होते त्याप्रमाणे ते कन्नड भाषेतील एक प्रसिद्ध कवि होऊन गेले. त्यांची ग्रंथरचना उपलब्ध आहे.[९]

ह्या तीन व्यक्तींच्या उल्लेखाव्यतिरिक्त आणखी एका व्यक्तीचे नाव ओळ क्र. ३८ मध्ये आले असावे असे वाटते. त्या ठिकाणी लेखाचे अक्षरांचे टवके उडाल्यामुळे तो वाचला जात नाही :

खालील स्थलनामे ह्या शिलालेखात आली आहेत.

१ ) सोनलीपूर ( ओळ क्र. ३२ )
२ ) असुगे × × × × षेड ( ओळ क्र. ३३ )
३ ) धाकुटी कंमती ( ओळ क्र. ३७ )

सोनलीपूर म्हणजे सध्याचे सोलापूर होय. याचा उल्लेख काही प्राचीन लेखांमधून सोनलिगे असा येतो.[१०] या नावामध्ये अव्वल इंग्रजी काळापर्यंत खालीलप्रमाणे बदल होत गेला आहे. सोनलिगे–सोनलीपूर–[११] सोनलापूर–[१२] संदलपूर–[१३] सोल्लापूर– सोलापूर– शीलापूर आणि आता पुन्हा सोलापूर.

दान देण्यात आलेल्या गावाचे नाव असुगे + + + षेड ( खेड) असे आहे. परंतु त्याचे पूर्ण नाव जोपर्यंत हाती लागत नाही तोपर्यंत त्याची स्थलनिश्चिती कठीण आहे.

तिसरे स्थलनाम धाकुटी कमंती असे आहे. प्रस्तुत लेख सापडलेले गाव कामती ( खुर्द ) याचे हे प्राचीन नाव होय. आता सुद्धा लोक त्यास धाकटी अथवा लहान कामती ह्या नावानेच ओळखतात. कामती ( खुर्द ) हे सरकारी कागदपत्रातील नाव, 'धाकुटी' हा शब्द शुद्ध मराठी आहे. हा शब्द ज्ञानेश्वरीत आला आहे.[१४] या एका शब्दावरून हा लेख मराठी म्हणता येणार नाही. या शब्दाप्रमाणेच इतर अनेक शब्द जसे सके; संवछर, वदि वगैरे आले आहेत. वास्तविक हे सर्व शब्द मुळातले संस्कृतच. परंतु मराठी भाषेतल्या शिलालेखात शके ऐवजी सके–सकु, संवत्सरे ऐवजी संवछरे आणि वद्य ऐवजी वदि या रूपात येतात. अशा मराठी रूपात हे शब्द कोरण्यात– म्हणजे ह्या संस्कृत शिलालेखात– कोरवय्याच जबाबदार असावा असे वाटते.

## आशय व चर्चा

प्रस्तुत लेखाचा उद्देश कपिलसिद्ध मल्लिकार्जुनास असुगे + + + षेड दान देणे हा आहे. त्या अनुषंगाने सध्याच्या दृष्टीने बरीच महत्त्वाची माहिती त्यात लिपिबद्ध झाली आहे. ओळ क्र. १–१८ सिद्धरामेश्वरांचे एक संस्कृत वचन लिपिबद्ध झाले आहे. अशाचप्रमाणे त्यांची इतर अनेक कन्नड–संस्कृत वचने पुष्कळ शिलालेखांमधून अभंग व अक्षर होऊन राहिली आहेत.[१५] प्राचीन महाराष्ट्रातील मराठीचे कवि, संत मंडळींची नांवे व त्यांचे अभंग अशा तऱ्हेने

अनुक्रमणिका

शिलालेखांतून आल्याची उदाहरणें जवळ जवळ आपल्याकडे नाहीत. याला कारण काय बरे असावे ? नाही म्हणायला काहींची नावें याच हरिश्चंद्र गडावर कोरीव स्वरूपात मिळाली आहेत[१६] परंतु त्यांच्याबद्दल मजकूर काही नाही. कर्नाटक – महाराष्ट्र व तामिळनाडू – आंध्रप्रदेशातील कन्नड, तमिळ, तेलगू शिलालेखांतून शेकडो संतांची, कवींची नांवे व त्यांची कृति लिपीबद्ध झाली आहे. मोठ्या आदराने त्यांचा गौरव केला आहे.[१७] ह्या उलट आपल्याकडे श्री ज्ञानदेवानी आपल्या ज्ञानेश्वरीत यादवराजा रामचंद्रदेवाचा उल्लेख करतात.[१८] मुकुंदराज विवेकसिंधूत शारंगधर राजाचा उल्लेख करतात[१९] सूक्ष्मपणे शोधल्यास आणखीन काही उदाहरणे सांपडण्याची शक्यता नाकारता येणार नाही. पण मुकंदराज, ज्ञानदेव, नामदेव आदी प्राचीन संतांची नावें व त्यांच्या संबंधीचा मजकूर कोरीव लेखांतून सापडणे नाही.

ओळ क्र. १८–२९ मध्ये यादवांचे पारंपरिक कोरीव लेखांतून दिसून येणारी बिरुदावली आलेली आहे. या बिरुदावलीच्या सुरवातीस यादव राजास महामंडलेश्वर असे स्पष्ट म्हटले आहे. त्याचबरोबर त्याचे सम्राटदर्शक– श्रीमत्प्रौढप्रतापचक्रवर्ति– हीसुद्धा आलेली आहे. दिल्लीच्या सुलतानाकडून युद्धात पराभव प्राप्त झाल्यानंतर सुद्धा यादवांचे जे काही कोरीव लेख मिळाले आहेत, त्यातील एकातही त्यांनी आपण कोणाचे तरी मांडलिक आहोत असे सांगितले नाही. ह्या लेखात मात्र त्यांना मंडलिक पदवीने संबोधित केलेले आहे हे चिंतनीय आहे. लेखात आलेल्या यादव राजाचे नाव श्री सिंघनदेव असे आहे. हा राजा रामचंद्रदेवाचा पुत्र. ह्यानी देवगिरीच्या गादीवर इ. स. १३११–१३१८ असे राज्य केले. आणि हा लेख इ. स. १३१६ चा आहे. म्हणजे त्यानंतर केवळ दोन वर्षेच तो गादीवर होता. त्यानंतर देवगिरीवरची यादवांची सत्ता संपुष्टात आली. म्हणून सध्या तरी हा लेख यादवांचा शेवटचा कोरीव लेख ठरतो. तसेच सिंघणदेव ( तिसरा ) याचा हा पहिलाच ज्ञात लेख होय.

ओळ क्र. २९–३२ सोनलीपुरास राहणाऱ्या मंडलिकमंडिताधिराज बलरायदेव याची काही बिरुदे व त्याचे नाव, आले आहे. ओळ क्र. ३२–३६ मध्ये महामहिमा कपिलसिद्ध मल्लिकार्जुनदेवाचे नांव त्यास दान दिलेल्या ग्रामाचे नाव व सिवनाथाचे नाव व इतर मजकूर आला आहे. कपिलसिद्ध मल्लिकार्जुनदेव हे सिद्धरामेश्वराचे आराध्यदैवत. ह्या देवास त्या काळच्या राजांनी पुष्कळ दाने दिली आहेत. ती सर्व शिलालेखातून लिपीबद्ध झाली आहेत. आतापर्यंत त्यास दाने दिलेली व त्याला संबंधित मजकूर असलेले

सुमारे २५ शिलालेख उपलब्ध झाले आहेत. ओळ क्र. ३६–३९ मध्ये लेखाचा काल, धाकुटी कंमतीच्या महामंडलेश्वराचे ( नाव नष्ट झाले आहे. ) नाव, दान सूर्यचंद्र असेपर्यंत चालेल अशी घोषणा व मंगलमहाश्री असा मजकूर आलेला आहे. अणि शेवटी ओळ क्रं. ३९–४३ मध्ये शापाशिर्वाचक मजकूर कोरून लेख संपविला आहे.

## लेखाचे महत्त्व

खालील कारणामुळे प्रस्तुत कामती ( खुर्द ) शिलालेख महत्त्वाचा ठरतो.

१ ) मध्ययुगीन वीरशैव संतकवि व महान योगी श्री सिद्धरामेश्वराचे एक संस्कृत वचन यात आले आहे.

२ ) यादवराजा सिंघणदेव ( तिसरा ) याचा प्रकाशात आलेला पहिला लेख. तसेच यादवांचा जवळ जवळ शेवटचा कोरीव लेख.

३ ) यादवांच्या सुमारे ५०० कोरीव लेखांमध्ये यालेखात सर्वप्रथम आपल्या नावापुढे मंडलिक दर्शक बिरुदे आली आहेत.

४ ) यादव राजा रामचंद्रदेवाच्या मुलाचे नाव शंकरदेव असे नसून सिंघणदेव असे होते.

५ ) संपूर्ण लेख संस्कृत भाषेत असून सुद्धा काही शब्द मात्र मराठीत आहेत. उदा. सके, संवछर, वदि, श्रीमतु वगैरे.

लेखाचे वाचन पुढीलप्रमाणे आहे. वाचनात शक्यतो दुरुस्ती टाळली आहे. लेख ज्याप्रमाणे शुद्ध–अशुद्ध कोरला आहे तसेच दिले आहे.

## कामती ( खुर्द ) शिलालेख वाचन[२०]

१) ।। ओम्[२१] ।। स्वस्ति । श्री वंदे तं कपिलसिद्ध मल्लिकार्जुनमीस्वरं यत्पा ।।
२) ।। द पंकजकिंजल्कं रंजयति जगत्रयी ।। ॐ जयतु परमेस्व ।।
३) ।। र परमात्मेस्वर: सहर्षस्वोत्सव सुसूक्ष्म एकवर्णो भू ।।
४) ।। त्वा योगिनां मानसाग्रे यो विस्वरूपो वृषस्वरूपी यजमान ।।
५) ।। स्वचार्यस्य स्वयमेव भूत्वा योगादि कालज्ञानं सर्व संपाद्य यो ।।
६) ।। गरमषीय क्षेत्र सुस्थिरं स्थापयित्वा शलाकां गृहित्वा नव्य स्त्री ।।
७) ।। सैलं क्रित्वा कपिलसिद्धमल्लिकार्जुनदेव एव स्थिरतरं स्थित्वा पु ।।
८) ।। ण्यपाणे समाहूय समादिसति: ते उचतुर्भो देव किं कर्तव्य ।।
९) ।। मिति: यवमुक्ते अस्मिनस्थाने सर्वमान्यं क्रित्वा देसान ग्रामा ।।

अनुक्रमणिका

१०) ।। न्तु भूमिर्धनानी चास्मै लिंगाय हस्तोदकं क्रित्वा दत्तानि मन ।।
११) ।। सि जुगुप्सां विहाय ग्रिण्हामिति ब्रुवाणां: तस्य मातरं मातापि ।।
१२) ।। तरं पितरजातं सर्व सप्तसप्ततिकोटिवर्षपर्यंतं क्रिमि ।।
१३) ।। कुंडमधो प्रक्षिपितु तमाहुति ग्रिहं तिष्ट रे पाप: अस्य देव ।।
१४) ।। स्य भूधनेभ्योविभेम्यहमिति सर्पवेष्टितं इव मनसि जय कि ।।
१५) ।। कं चकिचकितं वेगं नमस्कुर्वाणमहिक भोगमभिलाक्षितं दत्वा ।।
१६) ।। दीर्घायुषं क्रित्वा गच्छरे पुण्य कैलासं : इति द्वय (न्यायान्यायम्) ।।
१७) ।। नु पुण्यापापे प्रेक्षमाणे तौ दौ नयत नयत न स्खलति ( तथ्यं तथ्यं सत्यं प ) ।।
१८) ।। स्यत भो : xxxxxxxxx यादव कु ( xxxxx ) ।।
१९) ।। × द्भूव श्रीमद्विजय क × × × × × महामंड (लेस्वर पर) ।।
२०) ।। मेस्वर: परमभट्टारक कीर्ति × × स्वज द्वारावती (पुरवराधिस्व) ।।
२१) ।। र विष्णूवंशोद्भूव यादवकुलकमल कलिक विकासभास्कर ।।
२२) ।। xxxxx ज xxxxxxxx मंदरमसितं मालवी महा ।।
२३) ।। × क × लितं xxxxxxxxxxxx वार × × × आमी ( ×× ) ।।
२४) ।। रक्षि रोषकारी xxxxxxx कमल xxxxx ( ××× ) ।।
२५) ।। र: होय × × × ल राज xxxxxxxxxxxxxन (xxxx) ।।
२६) ।। म परा xxxxxxxxxxxxxx मि ड × ( xxxx ) ।।
२७) ।। वष: राय × चां xxxxxxxxxxxxxxx ( × × × × ) ।।
२८) ।। श्रीमान प्रौढप्रताप चक्रवर्ति स्र (श्री) सिंघनदेव विजय ( × × ) ।।
२९) ।। केतिवा × ।। ൦ ।। स्वस्ति सकल भूपाल मुकुट विवेकमणि × ।।
३०) ।। स्य कालकिंकरनेषु × × मंगल सर्वसामंत सर्वसत्वम ( × × ) ।।
३१) ।। मस्व मंडलिक मंडिताधीराज बलराघवदेव × × × × (xxx) ।।
३२) ।। समय सोनलीपूर वसयती ।। ൦ ।। स्रीमतु महामहिमा क ।।
३३) ।। पिलसिद्ध मल्लिकार्जुनदेवस्य असुगे × × × × षेड क्षदित ( × ) ।।
३४) ।। णे × × × × × × × × × × × × षष्टौती × सिधत × कषत ।।
३५) ।। × × × × × लंभ मणियतु कल × लिषु य × × चारनियसि ।।
३६) ।। म अवार सिदनाथने कस्माका × × × मसके ।।०।। सके १२३ (८) ।।
३६ अ) —————————————— × x x x वि सम × ×
३७) ।। नल संवछर आषाड वदि × × अमावास्या : धाकुटी कंमती ।।
३८) ।। महामंडलेस्वर: × हाक × री x x x x क: माचंद्रार्क (xx) ।।

३९) ॥ कं समर्पितंयानु : ॥ मंगल महाश्री ॥ ७ ॥ दान पालन (योंम) ॥
४०) ॥ ध्ये दानश्रेयातु पालनं : दाता स्वर्गमे पप्तोति पालना दच्युतं (पदं) ॥
४१) ॥ गंण्यंते पसावो भूमैगण्यतं व्रिष्टिविंदव : न गण्यंते विधात्रा (वि) ॥
४२) धर्म सं [ र ] क्षणे फलं : अक x x x रक्षित्वा गौ कोटि वध (x x) ॥
४३) करस्थ अक रक्षित्वा : गौ कोटि पालनश्रेतु : ॥ ० ॥ ७ ७ ॥

संदर्भ टीपा :-

१. Indian Archaeology A Review 1964-65 No. 54 p. p. 60

२. संशोधकाचा मित्र – श्री ग. ह. खरे १९५१. पृ. ९५

३. The Yadavas and their times – of varma. 1970, ह्या ग्रंथात पृष्ठ ३६८ वर यादवांची वंशावळ दिली आहे त्यात 'संकरदेव' असेच नाव दिले आहे.

४. विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९७० पृ. १६१.

५. संशोधनमुक्तावलि सर ४ था – डॉ. वा. वि. मिराशी पृ. १४७.

६. तत्रैव पृ. १५८.

७. शासनदल्ली शिवशरणरु – डॉ. एम. एम्. कलबुर्गी. १९७०. पृ. ७३–८० ( कन्नड ).

८. South Indian Inscriptions Vol. XX p. p. 218.

९. कर्नाटक कविचरिते भाग १ श्री आर. नरसिंहाचार्य आ. २ री. १९७२. पृ. १९७–१९९ ( कन्नड. )

१०. Epigraphia Indica Vol. XXIII p. p. 194. संगुर शिलालेख. अशी बरीच उदा. देता येतील.

११. प्रस्तुतचा कामतीखुर्द शिलालेख.

१२. सोलापूरच्या किल्यातील कोरीव लेख – 'नवभारत' आगस्ट १९७५ पृ. ६३.

१३. तत्रैव. पृ. ६२

१४. ज्ञानेश्वरीचे शब्दभांडार– रा. ना. वेलिंगकर. १९५९ पृ. २५० स्तंभ १ ला.

१५. अ ) श्री सिद्धरामेश्वर वचनगणू– संपा. आर. सी. हिरेमठ. कर्नाटक विश्वविद्यालय धारवाड. १९६८ पृ. २५–६२ ( संस्करण विभाग ) ( कन्नड )

ब ) कर्नाटक विद्यापीठ पत्रिका खंड १० वा. १९६६. मधील सिद्धरामेश्वर आणि शिलालेखांशी व त्याच्या वचनांशी संबंधीत दोन कन्नड लेख. पृ. १८५–९१ व पृ. १९२–२१४.

१६. हरिश्चंद्रगडावरील शिलालेख– डॉ. वि. भि. कोलते. वि. सं. मंडळाचे वार्षिक– १९७०. पृ. ६५–७७.

१७. शासनदल्लि शिवशरणरु– डॉ. एम्. एम्. कलबुर्गी १९७०.

१८. तेथ यदुवंशविलासु । जो सकळकळानिवासु ।
न्यायाते पोषी क्षितीशु । श्री रामचंद्र ॥ १८०४ ॥
– 'ज्ञानेश्वरी' अध्याय १८ वा.

१९. शके अकरा दाहोत्तरु । साधारण संवत्सरु
राजा शारंगधरु । राज्य करी ॥
'विवेकसिंधू' उत्तरार्ध अ. ११.

२०. मी घेतलेल्या छापावरुन. ओळ क्र. १ ते १८ टाकळी शिलालेखाच्या आधारे.

२१. चिन्हाने.





अनुक्रमणिका








ग्रंथ– समीक्षा —

डॉ. वि. रा. करंदीकर

# ‘ चक्रपाणि ’ : काही उत्तरे, काही प्रश्न*

( पूर्वार्ध )

डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे यांचा ‘ चक्रपाणि ’ हा नवा ग्रंथ, षट्स्थल या विसोबा खेचरांच्या नव्याने उपलब्ध झालेल्या एका लहानशा प्रकरणाच्या निमित्ताने निर्माण झालेला असला, तरी त्यातील विवेचनाची झेप फार मोठी आहे. “ आद्य मराठी वाङमयाची सांस्कृतिक पार्श्वभूमी ” असे या ग्रंथाला त्यांनी जे दुसरे नाव दिलेले आहे ते या दृष्टीने अधिक सूचक आहे. विसोबा खेचर यांचे परम गुरु चांगा वटेश्वर, महानुभाव पंथाचे प्रवर्तक चक्रधर आणि त्यांचे परम गुरु चांगदेव राऊळ या तिघांचेही चक्रपाणि हे पर्यायनाम होते. हे साम्य ध्यानात घेऊन या ग्रंथाला चक्रपाणि असे प्रतीकनाम आपण दिलेले आहे, असे ढेरे यांनी म्हटलेले आहे. या तिघांच्या नावांमध्ये चक्रपाणीप्रमाणेच चांगदेव हा आणखी एक समान घटक आहे. योगी चांगदेव व चांगदेव राऊळ ही नावे तर स्पष्ट आहेत. द्वारकेत राहणारे म्हणून चांगदेव राऊळ हे द्वारावतीकार, तर पैठणमध्ये आपल्या उपदेशास प्रारंभ केला म्हणून त्यांचे प्रशिष्य जे चक्रधर ते प्रतिष्ठानीचे चांगदेव राऊळ म्हणून ओळखले जात असत. हे केवळ योगायोगाने घडले असेल काय, असा प्रश्न करून ढेरे यांनी या तीन व्यक्तींच्या संदर्भात असे म्हटले आहे की, “ उद्या एखादा समकालीन विश्वसनीय साक्षीदार उपस्थित झाल्यावर ती एकच व्यक्ती ठरली, तर मला तरी आश्चर्याचा धक्का बसणार नाही. ” ( पृष्ठ ३१२ ). ढेरे यांचा अभ्यास गाढा, निरीक्षणाचा आवाका तितकाच मोठा; त्यामुळे अशा प्रकारच्या शक्यता त्यांच्या प्रज्ञाचक्षूस सहज दिसतात. त्यांच्या अनुमानशक्तीची ही झेप पाहून आपण चकित झाल्याशिवाय राहत नाही. सखोल व्यासंग, दीर्घकाळचे चिंतन आणि काही एक प्रतिभाशक्तीचे देणे हे सारे असल्याशिवाय अशी झेप घेता येत नाही. चकित करून सोडणारे असे कितीतरी निष्कर्ष ढेरे यांच्या या संशोधनपर ग्रंथात अभ्यासकांना आढळून येतील.

---

* चक्रपाणि ( आद्य मराठी वाङ्मयाची सांस्कृतिक पार्श्वभूमी )
लेखक : डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे
प्रकाशक : विश्वकर्मा साहित्यालय, पुणे – ४११०३०
जानेवारी १९७७, पृष्ठे ३३५, मूल्य चाळीस रुपये

जागोजाग नवी माहिती

आपल्या ज्ञानात भर घालतील अशा अनेक नवनव्या गोष्टी ढेरे सहज जाताजाता सांगतात. त्यांनी दिलेल्या माहितीमुळे आपल्या विचारांना नवी दिशा मिळते, तर जाणकारांना शोधाच्या निराळ्या जागा दिसू लागतात. चांगा वटेश्वरांनी आपल्या तत्त्वसार या ग्रंथाची रचना जेथे केली त्या हरिश्चन्द्र-गडाची कितीतरी माहिती ढेरे यांनी या ग्रंथामध्ये एका स्वतंत्र प्रकरणात दिलेली आहे आणि पुरंदरच्या पायथ्याशी असलेल्या पूर येथील नारायणेश्वराच्या मंदिरात आढळणाऱ्या शिलालेखाशी तिचा सांधा जोडलेला आहे. सासवडला एक वटेश्वर शिवाचे मंदिर आहे व तेथील सोपानदेव समाधिमंदिरात आजही जे घराणे पूजाअर्चा करीत आहे ते चांगदेव घराण्यातील आहे, या माहितीचा उपयोग चांगा वटेश्वराविषयी संशोधन करताना होण्यासारखा आहे याकडे ढेरे आपले लक्ष वेधतात आणि मग त्या जीर्णशीर्ण व दुर्लक्षित अशा स्थानांकडे आपण एका वेगळ्याच जाणिवेने पाहू लागतो. बुलढाणा जिल्ह्यातील जळगाव–जामोदला असलेले भर्तृहरीचे मंदिर आणि सोलापूर जिल्ह्यातील वैराग या गावी असलेले नाथमंदिर या दोहोंचा नाथसंप्रदायातील वैरागी शाखेचा प्रवर्तक जो भर्तृहरी त्याचा शोध घेण्याच्या दृष्टीने उपयोग होण्यासारखा आहे, हे ढेरे यांनी सांगितल्यामुळे आपणांला कळते. अर्थात हे कळले तरी त्याचा पाठपुरावा करण्याचे काम आपण त्यांच्यावरच सोपवणार असतो, हा भाग वेगळा. पण ढेरे यांचे अवलोकन आणि चिंतन कसे चौफेर आहे ते यामुळे ध्यानात आल्याशिवाय राहत नाही. चक्रधरांचा रसविद्येशी परिचय असावा एवढे लीळाचरित्रातील काही उल्लेखांवरून आपल्या ध्यानात आलेले असते, पण आपण तेवढ्यावरच तृप्त असतो. त्या रसविद्येसंबंधीचे प्रमुख ग्रंथ कोणते आहेत आणि महाराष्ट्रात त्या विद्येची केन्द्रे कोठे होती ही माहिती नाना ठिकाणी तिचा शोध घेऊन ढेरे आपल्यापुढे ठेवतात आणि मग पूर्वी ज्यांचे केवळ संदिग्ध आकलन झालेले असते ते तपशील आपल्याला व्यवस्थितपणे समजतात. गुंडम राऊळ यांच्याकडून शक्तिस्वीकार केल्यानंतर चक्रधरांनी जी बारा वर्षे तपश्चर्या केली ती विदर्भातील सालबर्डीच्या डोंगरामध्ये, अशी महानुभावीयांची परंपरागत समजूत. ढेरे असे सप्रमाण दाखवितात की, चक्रधरांनी ही तपश्चर्या श्रीपर्वतावर केली व हा श्रीपर्वत आंध्रप्रदेशात आहे. चक्रधरांच्या एकांककाळातील व्याघ्र–विद्रावणाची लीळा जेथे घडली, ती जागा म्हणजे चांदा जिल्ह्यातील सुकळी हे गाव नव्हे तर आंध्रमधील द्राक्षाराम हे प्रख्यात शैव क्षेत्र आहे, असे त्यांनी दाखविले आहे. उधळीनाथांकडून

वयस्तंभिनी विद्या घेतल्याचा चक्रधरांच्या आयुष्यातील प्रसंग विदर्भात काटोल येथे घडला, असे आजवर मानले जात असे. हे मत इतके सर्वमान्य होते की त्याबद्दल कोणाला शंकाही येत नसे, कारण महानुभाव ग्रंथांतच त्याला आधार आहे अशी कल्पना होती. ढेरे यांनी असे साधार स्पष्ट केले आहे की, ती घटना दक्षिणेतील कांची या सुप्रसिद्ध नगरात घडली आहे. विसोबांनी जेथे नामदेवांवर अनुग्रह केला ते औंढ्या नागनाथ हेच शैवांच्या मत्तमयूर शाखेशी संबंधित असे प्राचीन आमर्दक क्षेत्र आहे, तर पुणतांबे येथे समाधिस्थ झालेले चांगा केशवदास हे चांगा वटेश्वरांहून भिन्न आहेत; हे ढेरे यांनी दाखवून दिले आहे. काश्मिरी शैव संप्रदायाचे आदिपीठ हे सुदूर कामरूपात वा काश्मिरातही नसून ते नाशिक-जवळच्या त्र्यंबकेश्वर पर्वतावर असलेल्या त्र्यंबकमठिकेत आहे, हे नवव्या शतकात होऊन गेलेल्या सोमानन्दांच्या शिवदृष्टि या ग्रंथाच्या आधारे ढेरे सांगतात. हा त्यांनी दिलेला तपशील निवृत्तिनाथांना गहिनीनाथांकडून त्र्यंबके-श्वरला उपदेश मिळाला या परंपरागत दंतकथेला काही ऐतिहासिक परिमाण प्राप्त करून देतो, एवढेच नव्हे तर ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानावर आढळणाऱ्या काश्मिरी शैव तत्त्वज्ञानाचा प्रभाव उलगडून दाखविण्यासाठी तो साहाय्यक ठरतो. ढेरे यांनी या ग्रंथामध्ये अशी विविध प्रकारची माहिती दिलेली आहे आणि तीमुळे वाचकाच्या ज्ञानाची क्षितिजे रुंदावत जातात, हा त्यांच्या लेखनाचा फार मोठा विशेष आहे. वाचकांनी यासाठी ढेरे यांचे फार ऋणी राहिले पाहिजे.

## निमित्त छोटे, विवेचन व्यापक

या ग्रंथाचे निमित्तच पाहू गेले तर ते फार छोटे आहे. विसोबा खेचर यांनी लिहिलेले षट्स्थल या नावाचे एक प्रकरण एका जुन्या हस्तलिखित बाडामध्ये ढेरे यांना उपलब्ध झाले. हे विसोबा सुप्रसिद्ध संत नामदेव यांचे गुरू. नामदेव हे ज्ञानदेवांचे सांगाती आणि ज्ञानदेव–नामदेव ही अनन्यसामान्य जोडी महाराष्ट्रातील वारकरी पंथाला सुप्रतिष्ठित करणारी. ज्ञानेश्वरांची गुरुपरंपरा नाथसंप्रदायात पोचणारी. विसोबा खेचरांचे परम गुरू हे महायोगी चांगदेव, त्यांच्यामुळेच ज्ञानेश्वरांच्या चांगदेवपासष्टीची रचना झाली. ज्ञानेश्वरांचे परात्पर गुरू गोरक्षनाथ, तर ढेरे असे सांगतात की चांगदेवांना उपदेश करणारी योगिनी मुक्ताई ही गोरक्षनाथांची शिष्या. हे गोरक्षनाथ व ही मुक्ताई आंध्र-प्रदेशातील श्रीपर्वतावर काही काळ वास्तव्य करीत होती. ढेरे असे म्हणतात की तेथे गोरक्षनाथांची भेट अल्लमप्रभूंशी झाली. हे अल्लमप्रभू कर्नाटकातील वीरशैव पंथाचे अध्वर्यू. गोरक्षनाथ व अल्लमप्रभू यांच्या भेटीमुळे नाथपंथावर वीरशैव तत्त्वज्ञानाचा परिणाम झाला. वीरशैव तत्त्वज्ञानातील षट्स्थलसिद्धान्त

मुक्ताईने चांगदेवास सांगितला व त्यांच्या द्वारा विसोबांच्या मार्फत तो पुढे नामदेवांपर्यंत पोचला, एवढेच नव्हे तर ज्ञानेश्वरीतही त्याचा पडसाद उमटला. मुक्ताईला श्रीपर्वतावर चक्रधर भेटले व त्या भेटीमुळे आपला जन्म सफल झाला असे तिने मानले. श्रीपर्वतावरील सिद्धांच्या व नाथांच्या सहवासाचा परिणाम चक्रधरांवर झाला. पण का कोण जाणे, त्यांनी एक नवीनच पंथ काढला. तो महानुभाव संप्रदाय म्हणून विख्यात झाला. या पंथाचे आचार्यत्व त्यांनी नागदेव या आपल्या पट्टशिष्याकडे दिले. ते देण्यापूर्वी त्यांनी आपल्या रघुनाथ या शिष्यास वेदान्तमार्गाचा उपदेश केला होता. हे रघुनाथ म्हणजे मराठीतील आदिकवी मानले जाणारे जे मुकुन्दराज त्यांचे गुरू. या रघुनाथांचे गुरू जे हरिनाथ तेच चक्रधर होत आणि या हरिनाथांचे वर्णन करतेवेळी विवेकसिंधूमध्ये मुकुंदराज चक्रधरांचे चरित्र न सांगता त्यांचे परम गुरू जे चांगदेव राऊळ त्यांचे चरित्र देतात, अशी आणखी माहिती ढेरे देतात. या ग्रंथातील विवेचन किती निरनिराळ्या व्यक्तींच्या जीवनातील घटनांचा वेध घेण्याचा प्रयत्न करते, हे एवढ्यावरून ध्यानात यावे. ग्रंथाचा हा आटोप सामान्य नाही. नाथ, वीरशैव, वारकरी आणि महानुभाव या साऱ्या पंथांचा मागोवा तर येथे घेतला आहेच, पण इतिहासकालात मागे जाऊन त्यांचा धागा लाकुल पाशुपत संप्रदायापर्यंत नेऊन पोचवलेला आहे. गोरक्षनाथ–मुक्ताई–चांगदेव, चांगदेव राऊळ–गुंडम राऊळ–चक्रधर, हरिनाथ–रघुनाथ–मुकुन्दराज अशा निरनिराळ्या गुरुपरंपरांचा शोध घेण्याचा आणि त्यांचे परस्परसंबंध उलगडून दाखवण्याचा प्रयत्न येथे केलेला आहे.

### धूसर यादवकालावर प्रकाश

मराठी वाङ्मयाचा प्रारंभकाल म्हणजे यादवकाल. इतिहासाच्या दृष्टीने पाहिले तर हा अतिशय धूसर आहे. त्यातील कितीएक व्यक्ती व त्यांची जीवने यांविषयीची माहिती अद्याप नीट उपलब्ध झालेली नाही. इतिहासाला सत्याची मातब्बरी सर्वांत अधिक आणि हे सत्य तर विभिन्न पंथांच्या अनेकानेक ग्रंथांतील अस्पष्ट अशा उल्लेखांतून दडून बसलेले. ते शोधण्यासाठी संशोधकाची दृष्टी सूक्ष्म असावी लागते, साऱ्या साधनांचा धांडोळा घेण्याची तयारी त्याने ठेवावी लागते आणि ज्ञात इतिहासातील अज्ञात दुवे जोडण्यासाठी त्याच्या ठायी प्रतिभाही असावी लागते. हे सारे ढेरे यांच्याजवळ आहे आणि म्हणूनच ते हा ग्रंथ लिहू शकले आहेत. यासाठी त्यांनी अपार परिश्रम घेतले आहेत. अर्वाचीन काळातील विद्वानांचे ग्रंथ तर त्यांनी पाहिले आहेतच, पण जुन्या पोथ्या व हस्तलिखितेही धुंडाळली आहेत आणि त्याहीपलीकडे महाराष्ट्रात इकडेतिकडे विखुरलेल्या शिलालेखांवरदेखील त्यांनी दृष्टी टाकलेली आहे. संबंधित अशी

सारी साधने स्वतः पाहावयाची असा त्यांचा कटाक्ष आहे, त्यामुळे हरिचंद्रगडावरील शिलालेखाच्या वाचनात डॉ. कोलते यांच्यासारख्या मुरब्बी संशोधकाच्या नजरेतून निसटलेल्या गोष्टी ते टिपू शकले आहेत. ढेरे हे वृत्तीनेच संशोधक आहेत. आपल्या अध्ययनाच्या विषयाशी संबंधित अशा माहितीचा कण आढळण्याचा संभव कोठे दिसला की, तो हाती लागावा व तो डोळे भरून पाहून त्याच्या अंतरंगात डोकावावे म्हणून ढेरे तिकडे प्रस्थान ठेवतात. त्यांनी आजवर अशा कैक शोधयात्रा केल्या आहेत. जुन्या मराठी वाङमयाचा इतिहास सुसंगतपणे मांडता यावा म्हणून गेली अनेक वर्षे ढेरे यांनी जे परिश्रम केले आहेत त्याला आजच्या पिढीत क्वचितच तोड सापडेल. क्षेत्र वेगळे असले तरी ही इतिहासाचार्य राजवाड्यांची परंपरा आहे. ती जागवणारे जे संशोधक आज महाराष्ट्रात आहेत त्यांत ढेरे यांचा क्रम फार वरचा आहे. प्रस्तुत ग्रंथामध्ये त्यांनी ज्या प्रश्नांचा विचार केलेला आहे त्यांचे चिंतन ते गेली तेरा चौदा वर्षे करीत आहेत. या अवधीत या विषयाशी संबंधित असे जे निरनिराळे सतरा अठरा शोधनिबंध त्यांनी प्रसिद्ध केले, त्यांची यादी त्यांनी परिशिष्ट पाचमध्ये दिली आहे. त्या लेखातील बहुतेक आशय या ग्रंथात त्यांनी समाविष्ट केला आहे. दीर्घकाल केलेल्या चिंतनानंतर ढेरे यांनी हा ग्रंथ अभ्यासकांसमोर ठेवला आहे हे यावरून स्पष्ट होईल.

## विसोबांचे ‘शडूस्छळ’

या ग्रंथामध्ये ज्या निरनिराळ्या प्रश्नांचा छडा लावण्याचा प्रयत्न ढेरे यांनी केला आहे त्यांचा प्रारंभबिंदू व निमित्तकारण विसोबा खेचर यांचे शडूस्छळ या नावाचे एक छोटे प्रकरण आहे, हे वर सांगितलेच. तीन प्रसंगांत विभागलेले हे प्रकरण जवळजवळ सातशे ओव्यांचे आहे. या प्रकरणात विसोबांनी मांडलेल्या तत्त्वज्ञानाचा विचार ढेरे यांनी केलेला नाही. विसोबांनी आपली जी गुरुपरंपरा दिलेली आहे ती पाहिल्यावर, मराठी वाङमयाच्या आदिपर्वातील चांगदेव राऊळ, चक्रधर, ज्ञानेश्वर, नामदेव, मुकुन्दराज, चांगा वटेश्वर, विसोबा, आदी महत्त्वाच्या व्यक्तींच्या चरित्रावर व परस्पर संबंधावर काही वेगळाच प्रकाश पडतो आणि त्यांतील अनेक कूटे उलगडू लागतात, निदान ती उलगडण्याची एक नवी दिशा दिसू लागते; असे ढेरे यांना वाटले. या नव्या प्रकाशामध्ये त्या निरनिराळ्या व्यक्तींसंबंधी त्यांना जे काही म्हणावेसे वाटले त्यातून हा ग्रंथ निर्माण झाला आहे. ढेरे यांनी विसोबांच्या या हस्तलिखिताचा उल्लेख सर्वत्र षट्स्थल या नावाने केला आहे. पण त्याचे मूळ नाव शडूस्छळ असे आहे. याच मूळ नावाचा प्रयोग विवेचनात सर्वत्र करावयास हवा होता, असे प्रा. कुरुंदकर यांनी प्रस्तावनेत म्हटले आहे ते योग्य आहे. मूळ नावाचा संस्कृत पर्याय

वापरल्याने ग्रंथाच्या स्वरूपाबद्दल उगाचच काही वेगळी कल्पना मनात उत्पन्न होते. ग्रंथाची मराठी भाषाही शडूस्छळ या प्राकृत रूपाशी जुळेल अशीच आहे, हे त्यातील काही अवतरणे ढेरे यांनी उद्धृत केली आहेत त्यांवरून दिसते. ढेरे यांना उपलब्ध झालेल्या या हस्तलिखिताचा काळ कोणता म्हणावयाचा ? ज्या बाडात हा ग्रंथ उपलब्ध झाला त्याची आरंभीची व अखेरची बारा बारा पाने नष्ट झाली आहेत असे ढेरे म्हणतात. बाडात अनेक रचना उतरलेल्या आहेत. त्यांतील पाचवी रचना "पंचीकरण परिभाषा: संस्कृत–फारशी" अशी आहे. हा फारसी भाषेचा उल्लेख असेल तर महाराष्ट्रात बहामनी राजवट स्थिर होऊन फारसी भाषा सुप्रतिष्ठित झाल्यावर ते बाड लिहिले गेले असणार. ज्ञानेश्वरांच्या नावावर ज्या चार रचना यामध्ये दिलेल्या आहेत त्यांत स्तुति आणि मदळसा या नावाची दोन प्रकरणे आहेत. ती ज्ञानेश्वरांची मानता येतील असे वाटत नाही. या हस्तलिखिताच्या बाडाचा काळ व त्याची विश्वसनीयता यांविषयी अनुमान करताना हा मुद्दा ध्यानात घेणे आवश्यक आहे. ज्ञानेश्वरांची नसलेली दोन प्रकरणे त्यांच्या नावावर या बाडात समाविष्ट केली गेली आहेत, हे आपल्याला स्पष्ट दिसते; त्यामुळे विसोबांच्या बाबतीतही तसेच झालेले नसेल ना, अशी शंका मनात येऊन जाते.

षट्स्थल ही कर्नाटकात प्रवर्तित झालेल्या वीरशैव संप्रदायाच्या तत्त्वज्ञानातील एक विशिष्ट पारिभाषिक संज्ञा आहे. त्या पंथाच्या तत्त्वज्ञानामध्ये या संज्ञेने व्यक्त होणाऱ्या विचारास काही एक वेगळे व स्वतंत्र महत्त्व आहे. ढेरे यांचे एक प्रतिपाद्य असे की, वीरशैवांचा हा एक षट्स्थलसिद्धान्त विसोबांच्या या रचनेच्या द्वारा आणि त्यांचा जो विख्यात शिष्य नामदेव त्याच्या द्वारा मराठी संतांच्या वाङ्मयात आला. "विसोबांचा षट्स्थल हा ग्रंथ म्हणजे वीरशैवांच्या षट्स्थलसिद्धान्ताची धारा अल्लमप्रभू गोरक्षनाथ–मुक्तादेवी –चांगा वटेश्वर–कृष्णनाथ–विसोबा खेचर या तीर्थक्रमाने वाहत आल्याचा पुरावा होय" असे ढेरे यांनी ग्रंथाच्या अखेरीस म्हटले आहे (पृष्ठ ३०७). विसोबा खेचर हे नामदेवांचे गुरू आणि ज्ञानेश्वरमंडळाशी घनिष्ठ संबंध असलेले. ज्ञानेश्वर-नामदेवांच्या बरोबर त्यांच्या तीर्थयात्रेत ते होते, असेही म्हटले जाते. वारकरी संप्रदायातील या श्रेष्ठ व्यक्तींशी संबंधित असलेल्या विसोबांनी वीरशैव संप्रदायातील षट्स्थलसिद्धान्तावर रचना का करावी, असा प्रश्न ढेरे यांच्या मनात उत्पन्न झाला. वीरशैवांशी विसोबांचा संबंध कसा आला असेल व षट्स्थल-सिद्धान्ताशी त्यांचा परिचय कसा झाला असेल याचा शोध ते घेऊ लागले. विसोबांविषयी आजवर उपलब्ध असलेली माहिती फार त्रोटक आहे, पण ढेरे यांना काही नवीन माहिती उपलब्ध झाली. विसोबांविषयी मिळालेल्या या नव्या माहितीपासून या ग्रंथातील विवेचनाला प्रारंभ झाला आहे.

## 'शिल्पशास्त्र' आणि विसोबा खेचर

शिल्पशास्त्र या नावाच्या एका ग्रंथाचा आधार ढेरे यांनी घेतला आहे. त्या ग्रंथात पांचाळांची म्हणजे सुतार, सोनार, तांबट, लोहार व पाथरवट या पाच शिल्पजीवींची काही माहिती आहे. विसोबा हे या पांचाळ ज्ञातीपैकी होते असा या ग्रंथकाराचा अभिप्राय आहे. "आचार्य विसा" अशा शब्दांत त्यांचा या ग्रंथात उल्लेख केला आहे, विश्वेश्वर हे नावही वापरलेले आहे. विसोबा सराफ होते ही परंपरागत समजूत पांचाळांपैकी सोनार या व्यवसायाशी सुसंगत आहे, चांगा वटेश्वर हे गुरूचे नावही जुळते. शिल्पशास्त्र या ग्रंथात वीरशैव परंपरेशी जुळणारे उल्लेख व संज्ञा आढळतात, षट्स्थलातही त्या आहेत. हे सारे नोंदून ढेरे असा निष्कर्ष काढतात की, "पांचाळांत मोडणाऱ्या जाती चांगदेवपूर्व काळात अथवा चांगदेवकाळात स्वतंत्रपणे वीरशैव संप्रदायात समाविष्ट झाल्या असतील, तर विसोबांना षट्स्थलविचार हा त्यांच्या ज्ञातीतच मिळाला आणि तो गुरुपरंपरेने अधिक पुष्ट झाला असे मानावे लागेल" ( पृष्ठ ७६ ). एक शक्यता सूचित करणे एवढ्या मर्यादित दृष्टीने हे ठीक आहे, पण हा निष्कर्ष जरतरवर आधारलेला आहे. पांचाळांत मोडणाऱ्या जाती वीरशैव संप्रदायात समाविष्ट झाल्या हे यासाठी गृहीत धरावे लागते, हे गृहीत धरण्यास आधार काय? हे केवळ एक अनुमान आहे आणि त्या अनुमानालाही पुरेसा आधार नाही.

पुढे ढेरे म्हणतात, "एकूण शिल्पशास्त्र हा ग्रंथ विसोबांवर विशेष प्रकाश टाकणारा आहे हे मान्य करायलाच हवे" ( पृष्ठ ७६ ). हे मान्य करण्यास हरकत नाही. पण हा शिल्पशास्त्र ग्रंथ शके ११६५ मध्ये लिहिला गेला असे तो ज्यांनी छापला त्यांनी म्हटले असले, तरी ते विधान ऐतिहासिक दृष्टीने बरोबर आहे असे कसे मानावयाचे ? शिल्पशास्त्र शके ११६५ मधील तर षट्स्थल शके १२३१ च्या पूर्वीचे, कारण शके १२३१ मध्ये विसोबा समाधिस्थ झाले हे ढेरे यांनी मान्य केलेले दिसते. विसोबा समाधिस्थ-होण्याच्या आधी पासष्ट वर्षे ज्याची रचना झाली त्या शिल्पशास्त्र ग्रंथात विसोबांच्याविषयी "आचार्य विसा" व "त्यांचे अकराशे शिष्य" अशी गौरव-पर माहिती येणे कसे शक्य मानावयाचे? ते शक्य मानले तर शिल्पशास्त्र ग्रंथाच्या रचनेच्या पूर्वी म्हणजे शके ११६५ च्या आधी विसोबांना ही मान्यता प्राप्त झाली होती असे म्हणावे लागेल. असे म्हणणे हे विसोबांनी शके १२३१ मध्ये समाधी घेतली या समजुतीशी जुळत नाही. चांगा वटेश्वर हे विसोबांचे परम गुरु आहेत. त्यांचा काळ विसोबांच्या पूर्वीचा व शिल्प-शास्त्राच्या रचनेपूर्वीचा मानणे प्राप्त आहे. हे चांगा वटेश्वर पुढे ज्ञानेश्वर आदी भावंडांना भेटतात तो काळ शके १२१२ नंतरचा आहे. कालाच्या

दृष्टीने हे जुळत नाही. या उघड उघड दिसणाऱ्या कालविसंगतीकडे ढेरे यांचे दुर्लक्ष झाले काय? शिल्पशास्त्र या ग्रंथात दिलेला त्याचा रचनाकाल विश्वसनीय मानता येत नाही.

शिल्पशास्त्र आणि षट्स्थल या दोहोंच्या भाषेतील फरकही बाजूला सारण्यासारखा नाही. "अमुचा वंश कोठूनि झाला। कवणें हा गुरुमार्ग रचिला। आणि हा कैसा आगमु स्थापिला। तो कवणेपरी॥" ही ओवी शिल्पशास्त्रातील आहे, तर "त्वष्टिकु जन्मला ये इछानिं। पश्चिम बोलिजे म्हणौनि। ऐसें अघोर मुख जाणौनि। स्थापियेलें॥" ही ओवी षट्स्थलातील. शिल्पशास्त्राची भाषा सरळ सरळ उत्तरकालीन आहे, किंबहुना ती एकनाथकालीन मराठीची आठवण करून देते. तो ग्रंथ केव्हा रचला गेला हे यामुळे संशयित राहते. तो कोणी रचला याचाही काही उल्लेख त्या ग्रंथात नाही, हे ढेरे यांनी नोंदवले आहे (पृ. ७३). "वदले ग्रंथनिरूपणी। श्रीकृष्णनाथ॥" हा उल्लेख लेखकाच्या गुरूचा आहे, असा संभव ढेरे व्यक्त करतात (पृ.७४). संभव व्यक्त करण्यापुरता आधार आहे हे खरे. पण नंतर ते विधान करतात की, "श्रीकृष्णनाथांचा शिष्य असलेला शिल्पशास्त्राचा कर्ता हा विसोबा खेचरांचा गुरुबंधु ठरतो– 'श्रीकृष्णकुमरच' ठरतो" (पृ. ७६). जो प्रथम केवळ संभव होता त्याचे रूपांतर दोन पाने उलटल्यावर ठाम निष्कर्षात झालेले आहे. विसोबांचे गुरु कोणी कृष्णनाथ आहेत असे षट्स्थलावरून दिसते, त्याचा येथे संदर्भ आहे. पण शिल्पशास्त्राची भाषा उत्तरकालीन आहे हे दृष्टीआड करता येत नाही. आपली ही "शिवाचारनिष्ठा" चांगदेव वटेश्वर व आचार्य विसा या मार्गाने आली हे सांगताना शिल्पशास्त्राचा कर्ता श्रीकृष्णनाथांचा उल्लेख करीत नाही. मग मनात शंका उत्पन्न होते की, त्याने आधी केलेला श्रीकृष्णनाथांचा उल्लेख हा विसोबांच्या/आपल्या गुरूचा आहे का श्रीकृष्ण या देवतेचा आहे? शिल्पशास्त्र या ग्रंथाचा कर्ता, त्याच्या रचनेचा काल व त्याचे प्रामाण्य हे प्रस्थापित होत नाही, तोवर त्याच्या आधाराने काढलेले हे निष्कर्ष फार कच्चे राहतात. तत्त्वसार व षट्स्थल या ग्रंथांचा रचनाकाल, चांगा वटेश्वर व विसोबा यांचे समाधिशक, आणि ज्ञानेश्वर-नामदेवांचा निश्चितपणे माहीत असलेला काल, या सर्वांमध्ये फार मोठा विसंवाद उत्पन्न होतो; हे कुरुंदकरांनी प्रस्तावनेत दाखवले आहे. (पृष्ठ. ३१)

## अतिरंजित वर्णन

शडूस्छळमध्ये आपले गुरू म्हणून श्रीकृष्णनाथांचा उल्लेख विसोबांनी स्पष्टपणे केलेला आहे. विसोबांच्या नावावर जे काही थोडे अभंग उपलब्ध

आहेत, त्यांमध्ये विसोबांचे गुरू म्हणून ज्ञानेश्वर, सोपान व मुक्ताबाई या तिघांही भावंडांचा उल्लेख आलेला आहे. या भावंडांबद्दल वाटणारा आदरभाव विसोबांनी त्यांना आपल्या सद्‌गुरूच्या बरोबरीचे स्थान देऊन व्यक्त केला आहे, असे ढेरे म्हणतात (पृष्ठ ७२). हे म्हणणे ठीक आहे, पण साऱ्या गोष्टींचा तेवढ्याने पुरा उलगडा होत नाही. विसोबांचा आचार्य विसा हा उल्लेख, त्यांचे अकराशे शिष्य, त्यांना लाभलेले नामदेवांचे गुरुस्थान, खेचर हे त्यांना लावले जाणारे पद, अशा गोष्टींचा आधार घेऊन त्यांची असाधारण योग्यता ढेरे वर्णन करून सांगतात. पण या वर्णनामध्ये बरीच अतिरंजितता डोकावते. विसोबांचा "भारतविजयी महान् शिष्य" असा नामदेवांचा उल्लेख करून पुढे ढेरे लिहितात, "ज्ञानदेवांमुळे जसा निवृत्तिनाथांचा कीर्तिडिंडिम अखंड झडत राहिला, अगदी तसाच नामदेवांमुळे विसोबांचा ज्ञानाधिकार गाजत राहिला आहे" (पृष्ठ ७९). अलंकारिक वर्णन म्हणून वाचावयास हे बरे आहे, पण निवृत्तिनाथांना जी मान्यता आजवर लाभलेली होती तशी ती विसोबांनाही होती असे म्हणता येईल का ? त्यांच्या चरित्राची आधी पुरेशी माहितीच नव्हती आणि शडूस्छळ हा ग्रंथ तर आजवर केवळ अज्ञातच होता, जुन्या मराठी कवींना तो माहीत होता किंवा एखाद्या मातबर कवीने त्याचा आपल्या लेखनात कोठे उल्लेख केला होता; असे ढेरे यांनी दाखवलेले नाही. विसोबांची जी काही रचना आजवर ज्ञात होती ती त्यांना विशेष श्रेष्ठत्व देण्यास कारण होण्यासारखी नाही. शडूस्छळबाबत काही बोलता येत नाही, कारण ती रचना अद्याप प्रकाशित झालेली नाही. अशा परिस्थितीत त्यांच्या "नावाचा जयकार ... ... आजवर घुमत राहिला आहे" (पृष्ठ ७९) या वाक्याचा अर्थ काय करावयाचा ? नामदेवांबाबतही असेच आढळते, 'भारतविजयी' हा शब्द त्यांच्या संदर्भात अतिशयोक्तीचाच म्हणावा लागतो. "पंजाबात नामदेवांच्या पाऊल-खुणांचा मागोवा घेत शुद्ध परमार्थ जागवणाऱ्या नानकांनी ......" असे पुढे ढेरे यांनी गुरुमुख-मनमुख यांची चर्चा करताना म्हटले आहे (पृष्ठ ८९). येथील शब्दयोजनेमुळे असा ग्रह होतो की, नानकांनी जणू एका नामदेवांचेच अनुकरण केले आहे. विसोबांच्या नावातील खेचर या पदाच्या निमित्ताने "पुढे योगसाधनेने विसोबा देहविगलित बनले तेव्हा त्यांच्या खेचर या पदाला एक वेगळी प्रतिष्ठा प्राप्त झाली" असे प्रथम म्हणून, पुढे ढेरे यांनी "ना तरि कदलिचा गाभा । बुंथि सांडूनु उभा ।" आदी ज्ञानेश्वरीतील अवतरण उद्धृत केले आहे ( ज्ञानेश्वरी ६·२९६–९७ ). पण हा वर्णनाचा तपशील विसोबांच्या आध्यात्मिक अवस्थेचे वास्तव वर्णन करणारा आहे, हे एकदम कसे पत्करावयाचे? विसोबांनी योगसाधन केले होते, या ओव्यांत वर्णिलेल्या अवस्थेला पोचण्याइतके

केले होते, हे कशावरून ठरवावयाचे ? मांडे भाजण्याची कथा व नामदेवांना केलेला उपदेश या व्यतिरिक्त त्यांच्या चरित्रातील कोणत्याही घटनेची दंत-कथात्मक नोंददेखील आढळत नाही, हे ढेरे यांनीच सांगितलेले आहे. शिवाय महिपतींनी त्यांच्या खेचर या पदाचे स्पष्टीकरण काही वेगळे दिले आहे आणि म. म. दत्तो वामन पोतदारांना तर खेचर असे एक आडनावच आढळले होते, हाही उल्लेख त्यांनी केलेला आहे (पृष्ठे ७०–७२).

### गोरक्षनाथांवर अल्लमप्रभूंचा प्रभाव

वीरशैव संप्रदायाची विचारधारा विसोबांच्या मार्फत मराठी संतांकडे येऊन पोचली, असे ढेरे यांना म्हणावयाचे आहे. शडूस्छळ या प्रकरणाप्रमाणे पाहिले तर विसोबांची गुरुपरंपरा चांगा वटेश्वरांच्या द्वारा गोरक्षनाथांकडे जाते. वीरशैव पंथाचे मूळ प्रवर्तक कर्नाटकातील सुप्रसिद्ध संत अल्लमप्रभू आहेत. या दोघांची भेट झाली होती, त्यावेळी अल्लमांचा प्रभाव गोरक्षांवर पडला आणि षट्स्थलसिद्धान्तातील विचार गोरक्षनाथांच्या द्वारा नाथसंप्रदायात स्वीकारला गेला; असे दाखविण्याचा प्रयत्न ढेरे यांनी केलेला आहे. त्यासाठी त्यांनी प्रा. द. रा. बेन्द्रे यांच्या एका जुन्या लेखाचा आधार घेतला आहे. बेन्द्रे लिहितात, "अल्लम गोरखनाथाचा समकालीन होता. गोरखनाथाचे व अल्लमाचे वाद-संवाद झाले. त्यात गोरखनाथ हरला. गोरखनाथाने लिंगमहानुभावांत काही दिवस काढले. कानडीत वीरशैवांप्रमाणे वचने लिहिली. त्याची वचने उपलब्ध आहेत." बेन्द्रे यांची ही वाक्ये उद्धृत करून ढेरे म्हणतात, "प्रा. बेन्द्रे यांनी स्थूलपणे नोंदवलेला हा पुरावा प्रस्तुत संदर्भात अत्यंत महत्त्वाचा आहे...... हा सर्वच तपशील नाथांवरील वीरशैवांचा प्रभाव उलगडून सांगणारा आहे." (पृष्ठ १००). पण वरील वाक्यांमध्ये बेन्द्रे यांनी केवळ विधाने केली आहेत, त्या विधानांना त्यांनी कोणता पुरावा दिलेला आहे त्याचा उलगडा ढेरे यांनी काहीच केलेला नाही. अल्लम आणि गोरख यांचा वाद होऊन त्यात गोरख हरला, असे बेन्द्रे कोणत्या आधारावर म्हणतात ? कानडीत गोरखांची पदे आहेत असे म्हणतात, पण ती पदे गोरखांची कशावरून ? गोरखनाथांचा काल, त्यांचे स्थान व त्यांचा चरित्रपट यांबद्दल ठामपणे अद्याप काही बोलता येत नाही हेही विसरता येत नाही.

अल्लमप्रभू व गोरखनाथ यांच्या या भेटीला ढेरे यांनी आणखी एक आधार दिलेला आहे. प्रभुलिंगलीला हा संस्कृत, चामरस कवीचा प्रभुलिंगलीले हा कानडी आणि त्यावरून मराठीत ब्रह्मदासाने लिहिलेला लीलाविश्वंभर, या तीन ग्रंथांमध्ये अल्लमप्रभूंचे चरित्र वर्णिलेले आहे. कानडी ग्रंथ पंधराव्या

शतकातील आहे, संस्कृत ग्रंथ केव्हाचा आहे हे ढेरे यांनी येथे दिलेले नाही. अल्लमप्रभू व गोरखनाथ यांच्या श्रीपर्वतावरील कदलीवनात झालेल्या भेटीचे वर्णन ढेरे संस्कृत ग्रंथावरून देतात. आपले शरीर शस्त्राच्या आघाताला बळी पडत नाही, असा गोरखनाथांना गर्व होता. गोरखनाथांवर अल्लमप्रभूंनी तरवारीचे वार केले तर केवळ खणखण आवाज झाला, त्यांना काहीही इजा पोचली नाही. नंतर अल्लमप्रभूंवर गोरक्षांनी वार केले तेव्हा त्यांचे अंग आकाशासारखे निराकार आहे असे निष्पन्न झाले, त्यावर तरवारीचा वारच होईना. हे पाहून गोरक्षांचा गर्व हरण झाला व ते अल्लमप्रभूंना शरण गेले. अल्लमांनी त्यांना उपदेश केला की, शरीर बळकट झाले तर माया बळकट होते आणि शरीर व माया बळकट झाली तर प्रपंचाची सावली अधिक दाट होते, तेव्हा कायसिद्धीपेक्षा मोक्षसिद्धी महत्त्वाची आहे. गोरक्षनाथ या उपदेशावर लीन झाले आणि अल्लमप्रभूंनी त्यांना शिवदीक्षा दिली. एवढा वृत्तांत सांगून ढेरे लिहितात, "गोरक्षनाथांच्या परंपरेत अल्लमप्रभूंचा शिवागमोक्त षट्स्थलसिद्धान्त आत्मीयतेने स्वीकारला गेल्याची वस्तुस्थिती ध्यानात घेतली, तर प्रभुलिंगलीलेतील हे वर्णन अतिशयोक्त अथवा सांप्रदायिक पक्षपातीपणाचे मानता येणार नाही हे आता आपल्या ध्यानी येईल" (पृष्ठे १०३-४).

या वर्णनातील तरवारीचे वार करण्याचा भाग चमत्काराच्या स्वरूपाचा आहे, तेव्हा प्रभुलिंगलीला हे काव्य पुराणाच्या थाटाचे आहे हे उघड आहे. ब्रह्मदासाच्या लीलाविश्वंभर या मराठी काव्यामध्ये अल्लमांच्या उपदेशाचा जो वृत्तांत आहे त्यामध्ये अद्वैतभक्तीवर भर आहे, हेही ध्यानात घेण्यासारखे आहे. गोरक्षनाथांच्या परंपरेत षट्स्थलसिद्धान्त स्वीकारला गेल्याचा जो उल्लेख ढेरे करतात तो पुढच्या काळाचा संदर्भ आहे, तो सिद्धान्त केव्हा स्वीकारला गेला ते ढेरे सांगत नाहीत त्या अर्थी हा उल्लेख विसोबांच्या शडूस्छळचा असावा. पण षट्स्थलसिद्धान्त पुढे आला असे गृहीत धरले तरी अल्लम–गोरक्ष भेटीची ही कथा ऐतिहासिक दृष्टचा सत्य आहे की नाही हे ठरवण्यास त्याचा काही उपयोग नाही. चमत्कार बाजूला ठेवला तर वरील कथेतील तात्पर्य असे दिसते की, गोरक्षांचा केवळ कायसिद्धीवर भर होता, अल्लमांनी त्यांना मोक्षसिद्धीचे महत्त्व पटवून दिले. खरे तर षट्स्थलसिद्धान्तापेक्षाही हा विचार महत्त्वाचा आहे. पण त्यासाठी याहून निर्णायक असा पुरावा हवा. प्रभुलिंगलीला हे मूळ संस्कृत काव्य केव्हा लिहिले गेले हे समजले तर त्याची विश्वसनीयता अजमावता येईल. त्यावर आधारलेले कानडी काव्य पंधराव्या शतकातील आहे हे ढेरे यांनी येथे म्हटले आहेच, म्हणजे कानडी अनुवाद गोरक्षांनंतर चारपाच शतकांनी केला गेला आहे. मूळ संस्कृत काव्य कोणी व केव्हा लिहिले आहे हे समजल्या-

शिवाय, त्यावर आधारून काढलेले सिद्धान्त ऐतिहासिक दृष्टचा पत्करता येतात की नाही हे ठरवता येत नाही.

या संदर्भात आणखी एक गोष्ट ध्यानात घेण्यासारखी आहे. अल्लमप्रभूंच्या उपदेशामुळे गोरक्षनाथांमध्ये वर वर्णन केल्याप्रमाणे काही मूलभूत परिवर्तन घडून आले असेल, तर वीरशैव पंथाविषयी त्यांना विशेष आदराची भावना असावयास हवी, निदान त्यांनी प्रतिकूल उद्गार काढल्याचे उल्लेख तरी आढळता कामा नयेत. गोरक्षांच्या वाणीत लिंगधारकाविषयी "अत्रतत्र निषेधाचा सूर आढळतो" हे ढेरे सांगतात, पण तो ध्यानात घेण्यासारखा नाही असे सुचवतात; तो "स्वमताविषयीच्या एकान्तिक निष्ठेतून प्रकटलेला आहे" असे मानता येण्यासारखे आहे, असे गोरक्षांचे इतरत्र जे काही उद्गार आढळतात त्यावरून ते ठरवतात. गोरक्षांच्या हिंदी वाणीत लिंगोपासकांचा निषेध आहे, तेथे त्यांच्या दृष्टीपुढे "बाह्यवेषधारी दांभिक शैव आहेत" असे ढेरे म्हणतात आणि आपल्या म्हणण्याच्या समर्थनासाठी गोरक्षांचे एक पद संपूर्ण उद्धृत करतात, की ज्यामध्ये लिंग संज्ञेचा वापर त्यांनी जिव्हाळ्याने केलेला आहे असे ढेरे यांना वाटते (पृष्ठे १०४-५). अडचण अशी की, हे पद गोरक्षांचे कशावरून ? ज्या महाराष्ट्र-सारस्वतावरून हे पद ढेरे घेतात तेथे वि. ल. भावे यांनी "गोरक्षनाथांचे एक पद असे :" एवढेच म्हटले आहे. ते कोठून घेतले आहे, ते गोरक्षांचेच आहे हे कशावरून ठरवावयाचे; याबद्दल भावे काहीच सांगत नाहीत. पदातील भाषा उत्तरकालीन वाटते हेही ध्यानात घेण्यासारखे आहे. त्याची भाषा "गंगाजमनी" आहे हा उल्लेख ढेरे यांनीच येथे केलेला आहे.

## प्रत्यंतर पुरावा हवा

गोरक्षांच्या दृष्टिकोणात अल्लमप्रभूंमुळे काही बदल झाला हे प्रस्थापित व्हावयाचे असेल, तर त्या दोघांच्या भेटीनंतर नाथपंथाच्या शिकवणुकीमध्ये ध्यानात घेण्यासारखा फरक पडला असे दाखवणे आवश्यक आहे. योगसाधना हा नाथपंथात एक महत्त्वाचा भाग होता हे खरे आहे, पण केवळ कायसिद्धीवर म्हणजे शरीर चिरंजीव करण्यावर त्याचा सारा भर होता असे दिसत नाही. त्यांच्या शिकवणुकीत इतर अनेक महत्त्वाच्या गोष्टी आहेत. ज्ञानेश्वरीतील हठयोगाचे वर्णन हा नाथपंथाचा वारसा असेल तर तेथे कुंडलिनीजागृती व तीद्वारा अद्वैतसाक्षात्कार यांवर भर आहे, शरीर चिरंजीव करण्यावर नाही. त्याचप्रमाणे अल्लमांच्या द्वारा नाथपंथात काही महत्त्वाचे परिवर्तन झाले असे सिद्ध व्हावयाचे असेल, तर त्यासाठी वीरशैवांच्या ग्रंथांतील आधारांबरोबर नाथपंथीय ग्रंथांतील आधार मिळावयास हवेत. अल्लमांना काही विशेष आदराचे

स्थान असल्याचा उल्लेख जर नाथपंथी ग्रंथांमध्ये आढळून आला, तर तो महत्त्वाचा मानावा लागेल. तसे काही ढेरे दाखवीत नाहीत. गोरक्षनाथांची अपार लोकप्रियता ध्यानात घेऊन आपल्या पंथाच्या संस्थापकांचा प्रभाव त्यांच्यावरही पडला होता, अशी केवळ चमत्कारावर आधारलेली कथा प्रभुलिंगलीलेच्या कर्त्यानें कशावरून सांगितली नसेल ? असेच घडले असेल असा आग्रह धरण्याचे कारण नाही, पण अशा उलट दृष्टीनेही हा सिद्धान्त तपासून पाहावा लागेल.

बेन्द्रे यांच्या ज्या लेखाचा आधार ढेरे यांनी घेतला आहे त्याचा मूळ उद्देश, ज्ञानेश्वरपूर्वकालीन कानडी वाङमयाची माहिती देऊन ते मराठी वाङमयापेक्षा अधिक प्राचीन व अधिक समृद्ध आहे हे दाखवण्याचा आहे. अल्लमगोरक्ष यांच्या भेटीचा त्यांनी केलेला उल्लेख केवळ आनुषंगिक आहे. हे सारे ऐतिहासिक दृष्टचा प्रस्थापित होते असा दावा त्यांनी केलेला नाही. प्रभुलिंगलीलेत वर्णिलेल्या या अद्भुत भेटीचा सारा वृत्तांत देऊन त्या आधारे ढेरे असे म्हणतात की, "गोरक्षनाथ अल्लमप्रभूंच्या चरणी विलीन झाले. अल्लमप्रभूंनी त्यांना शिवज्ञानाने परिपूर्ण करून शिवदीक्षा दिली" ( पृष्ठ १०३ ). प्रश्न असा सुचतो की, मच्छिन्द्रांकडून पूर्वी दीक्षा घेतली असूनही गोरक्षांनी पुन्हा अल्लमांकडून दीक्षा घेतली असे मानावयाचे का ? तसे असेल तर याला वीरशैव पंथाबाहेरच्या व विशेषत: नाथपंथीय वाङमयातील प्रत्यंतरपुरावा मिळण्याची आवश्यकता आहे. ही जी शिवदीक्षा अल्लमांनी दिली तीमध्येच षट्स्थलसिद्धान्ताचा समावेश असेल, तर असा पुरावा मिळणे अधिक आवश्यक आहे. प्रभुलिंगलीले हा ग्रंथ बेंद्रे यांना माहीत असणारच. पण ते मात्र आपल्या उपरोक्त लेखामध्ये "गोरक्षनाथाचा पराभव अल्लमाने केला असेल नसेल" असे शंकास्पद विधान करतात व लगेच पुढे म्हणतात की "परंतु गोरखनाथ मात्र अल्लमांच्या प्रभावशाली चरित्रावरून बोध शिकला." म्हणजे पराभवाची कथा बाजूला ठेवून, गोरक्षनाथांवर अल्लमांचा प्रभाव पडला एवढ्यापुरते मर्यादित विधान बेंद्रे यांनी केले आहे. ढेरे मात्र हे सारे विवेचन संपल्यावर श्रीपर्वताच्या माहात्म्याकडे वळतात व प्रारंभीच म्हणतात की, "ज्या श्रीपर्वतावर ही ऐतिहासिक महत्त्वाची घटना घडली...." ( पृ. १०५ ). गोरक्षनाथांमध्ये महत्त्वाचे परिवर्तन घडून आल्यामुळे ही भेट ऐतिहासिक महत्त्वाची होती असा निष्कर्ष ढेरे नोंदवतात. असे वाटते की थोडी घाई होत आहे. असे म्हणण्यासाठी अधिक ठाम व विश्वसनीय पुराव्याची आवश्यकता आहे. (अपूर्ण)



अनुक्रमणिका

चर्चा — १. श्री. वसंत देवधर

डॉ. रा. चिं. ढेरे 'इतिहासाचार्य राजवाडे यांचे लोकसंस्कृतिविषयक अध्ययन' ( नवभारत मे १९७७ ) या लेखात म्हणतात—

" श्रीसांप्रदायिक विविध विषयांच्या दुसऱ्या खंडात राजवाड्यांनी 'चाफळखोऱ्यांतील एक स्त्रीगीत' आणि 'सज्जनगडावरचे एक लोकगीत' अशी दोन गीते सभाष्य प्रकाशित केली आहेत. पैकी पहिल्या गीताला ते 'लोकगीत' म्हणत नाहीत; केवळ 'स्त्री-गीत' असेच म्हणतात. कारण पहिले गीत स्त्रीने रचलेले आहे आणि त्या गीताला तिने आपली नाममुद्रा अंकित केलेली आहे. या गीतात शिवाजी महाराजानी वाघिणीचे दूध काढून ते समर्थांच्या उपचारार्थ दिल्याची अद्‌भुत कथा वर्णिलेली आहे ... ... ..." पृ. क्र. ४०-४१.

मी 'रामदास समीक्षेचा अभ्यास' या विषयावर प्रबंध लेखन करीत आहे. हा अभ्यास करीत असता 'चाफळखोऱ्यांतील एक स्त्रीगीत' याविषयी मला पुढील माहिती उपलब्ध झाली.

गीताचा परिचय करून देताना राजवाडे म्हणतात—

" खालील स्त्रीगीत चाफ ास रा. बापूराव उपाध्ये यांच्या येथील एका मुलीच्या तोंडून ऐकिले. गाणे कोण्या रंगनाथगुरुबाई नामक कवयित्रीने केले, गाणे जुने आहे असे चाफळचे लोक सांगतात. कवयित्री कोण कोठील वगैरे माहिती चाफळास कोणास नाही. याचा अर्थ असा की गाणे जुने आहे. भाषेवरून गाणे शंभर वर्षाचे जुने आहे की दोनशे वर्षांचे जुने आहे की पाचपंचवीस वर्षांतले आहे, ह्या त्रिविध शंकेचा परिहार करता येणे मुष्कील आहे. कारण भाषा बरीच अर्वाचीन दिसते. गाणे रामदासकाली रचिले असून उत्तरोत्तर जुनी भाषा अर्वाचीन होत जाऊन ती अगदी अलीकडील बनली असण्याचा संभव आहे." [१]

राजवाडे यांच्या या शंकांचे निरसन शं. श्री. देव यानी केले आहे. शं. श्री. देव म्हणतात :

... "रंगनाथगुरुबाई या कोणी कवयित्री नसून ते श्रीसमर्थशिष्य पालीमठाचे अधिपति रंगनाथ होत. त्या गीताची मी जी (बाडांक) १८२६ त नोंद केली आहे तीत,

पण घेऊनि सत्वर जाये । रंगनायगुरुबाईला ॥

अनुक्रमणिका





असा जो राजवाडे यानी पाठ दिला आहे त्या ऐवजी –

पय घेऊन सत्वर जाय । रंगनाथविभुला वाही ।।

असाच पाठ आहे. अर्थात् हे गीत रंगनाथकृत होय. ते तत्कालीन आहे व श्रीसमर्थांसाठी श्री शिवरायानी प्रत्यक्ष वाघिणीचे दूध आणले अशी जी कथा आहे ती यथार्थ आहे, इतक्या गोष्टी सिद्ध होतात.[२] "

शं. श्री. देव शिवाजी महाराजांनी वाघिणीचे दूध आणले ही गोष्ट सत्य मानतात तर राजवाडे यांच्या मते –

... "ह्यात वास्तविक भाग किती व कवित्वभाग किती ते पृथक् करण्याचे काम वाचकांवरच सोपविणे बरे. कदाचित् पाळीव वाघिणीचे दूध दरवेश्याकडून महाराजांनी पैदा करविले असेल. कुत्रीच्या प्रमाणे पाळीव वाघिणीचे दूध दरवेशी कारण पडल्यास काढतात म्हणून सांगतात. गीतात रानातल्या वाघिणीचे दूध महाराजानी काढले म्हणून म्हटले आहे, ते कदाचित् कवित्व असू शकेल." [३] ...

यावरून पुढील निष्कर्ष मांडता येतील.

( १ ) हे गीत कोणी रंगनाथबाई नावाच्या कवयित्रीने केलेले नसून, हे गीत रामदासांचे शिष्य पालीमठाचे अधिपती रंगनाथ यानी रचलेले आहे.

( २ ) हे गीत रामदासकालीन आहे.

( ३ ) शिवाजी महाराजानी रामदासांसाठी वाघिणीचे दूध आणले ही घटना देवांच्या मते यथार्थ आहे तर राजवाडे यांच्या मते शिवाजी महाराजांनी वाघिणीचे दध दरवेशाकडून आणून दिले असावे किंवा 'कवित्व' असू शकेल असे म्हटले आहे.

संदर्भ :—

( १ ) श्रीसमर्थरामदासस्वामी व छत्रपतिशिवाजीमहाराज यांजसंबंधाने चाफळखोऱ्यातील एक स्त्रीगीत पृ. ३८–३९

वि. का. राजवाडे श्री सांप्रदायिक विविध विषय, द्वितीय खंड.

श्री रामदास आणि रामदासी भाग सतरावा, सर दुसरा मणि सहावा.

सत्कार्योत्तेजक सभा धुळे, शके १८४२

( २ ) गेल्या अठ्ठावीस वर्षांत झालेले श्रीरामदासी संशोधन–प्रथम खंड.

शं. श्री. देव पृ. ३११

रामदास व रामदासी भाग २८, सत्कार्योत्तेजक सभा, धुळे. शके १८५५

( ३ ) उ. नि. वि. का. राजवाडे पृ. ३९

## चर्चा — २. श्री. सु. ह. जोशी

### एक शंका

सातवाहन हा प्राचीन भारतातील एक प्रमुख राजवंश होऊन गेला. प्रख्यात शालिवाहन शकाची स्थापना सातवाहन वंशातील राजाने केली अशी परंपरागत समजूत आहे. महाराष्ट्राच्या इतिहासाचा प्रारंभ सातवाहनकालापासूनच होतो. या वंशातील दोन प्रसिद्ध राजांची नावे गौतमीपुत्र सातकर्णी आणि वासिष्ठीपुत्र पुलुमावी अशी आहेत. अन्यत्र, नावापुढे वा मागे पित्याचे नाव लावण्याची पद्धत असताना नेमक्या या दोन राजांनी आपल्या मातांची नावे ( त्यांचे पुत्र म्हणून ) लावलेली आहेत. हे कसे ? तर कदाचित मातृसत्ताक पद्धत किंवा आपल्या मातांबद्दल या राजांना नितान्त आदर असेल नि त्यांचे पुत्र म्हणवून घेण्यात त्यांना धन्यता वाटत असेल, अशी काही स्पष्टीकरणे या संदर्भात दिली गेली आहेत. प्रसिद्ध अभ्यासक प्राचार्य श्री. श्या. मा. कुलकर्णी यांचे मत असे की राजमहेंद्रीपासून पाच मैलांवर धवलेश्वरम् येथे गोदावरीचे पात्र चार मैल रुंद आहे. इथे तिचे गौतमी गोदावरी आणि वसिष्ठ गोदावरी या नावांनी दोन प्रवाह होतात. आता गोदावरी या महती नदीचे सान्निध्य, तिचे पावित्र्य, तिच्या बाबतचा श्रेष्ठ आदर यांमुळे या दोन राजांनी आपण गोदावरीपुत्र आहोत असा अभिमानपूर्वक उल्लेख केलेला असावा. नेमके स्पष्टीकरण कोणते यावर आणखी काही प्रकाश टाकता येईल काय ? कृपया एक आवाहन !

अनुक्रमणिका






# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

## मराठी

(१) वैदिक संस्कृतीचा विकास ( तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ) ३०·००
(२) अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर ( पूर्वार्ध ) ७५·००
( ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती )
(३) इतिहासाचे तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) ... १०·००
(४) क्रोचेचे सौंदर्यशास्त्र : एक भाष्य ( अनु. डॉ. रा. भा. पाटणकर ) १०·००
(५) सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती ( प्र. रा. देशमुख ) १०·००
(६) पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास
( डॉ. सुमंत मुरंजन ) ... ... ... ८·००
(७) चार्वाक–इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) ६·००
(८) मानवाचा आदर्श ... ... ... ... ६·००
(९) नवमानवतावाद ... ... ... ... ५·००
(१०) गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... ... ५·००
(११) लोकशाहीचे धोके ( श्री. पन्नालाल सुराणा ) ... ४·००
(१२) भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श ( सौ. कमल पाध्ये ) ... ४·००
(१३) हिंदी साहित्यविचार ( प्रा. पॅरेलाल गोहेल ) ... .... ३·००
(१४) महाराष्ट्रातील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना
( श्री. चा. अ. दाभोळकर ) .... ... २·००
(१५) श्री. यशवंतराव चव्हाण– अभिनंदनग्रंथ ... ... २०·००
(१६) संशोधन साधना ( डॉ. वसंत स. जोशी ) १२·००
(१७) ज्ञानदेव चिंतन ( डॉ. वसंत स. जोशी ) २०·००
(१८) आनंदाचा डोह प्रा. रा. ग. जाधव ८·००
(१९) भावार्थ रामायण ( श्री एकनाथ महाराज कृत ) बालकांड १२·००
(२०) न्यायसार – आचार्य भासर्वज्ञप्रणीत मराठी भाषांतर व
अर्थबोधक टीपांसहित .... ... ५·००
(२१) तरंगयामिक व पुंजयामिक ( श्री. टोळे ) ... ५·००
(२२) संस्कार–संगरम् श्री. ग. गं. पेंढारकर ... १०·००

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई ( जि. सातारा )

ग्रंथ विक्रेत्यांना २० टक्के कमिशन.




